वाग्विलास प्रकाशन : : : : २

# रूपगर्विता

आणि

# सहा गोष्टी



लेखक

दिवाकर कृष्ण

किंमत १। रुपया

# प्रकाशकाचे दोन शब्द

वाग्विलास मंडळाचें दुसरें प्रकाशन वाचकांच्या हातीं देण्यास आम्हांस आनंद होत आहे. मंडळानें हातीं घेतलेल्या पंचवार्षिक योजनेंतील दुसरी पायरी आम्ही चढत आहोंत. १९४० च्या ऑगस्ट महिन्यांत ही योजना आखली व ऑक्टोबरमध्यें 'मराठवाड्यांतील गद्य वाङ्मय' हें पहिलें पुस्तक प्रकाशित केलें. पहिली पायरी चढण्यास आम्हास फारसा अवधी लागला नाहीं. पण ही दुसरी पायरी चढण्यासाठीं आम्हास सुमारें एक वर्षाचा काल लागला. पण यावरून तिसरी पायरी चढण्यासाठीं याहूनहि अधिक काल लागेल अशी वाचकानीं कृपा करून कल्पना करूं नये. प्रकाशनाच्या बाबतींत महाराष्ट्रांत व विशेषतः संस्थानांत कटु अनुभव आला असला तरी त्याची पुनरावृत्ती आमच्या प्रकाशन योजनेंत होणार नाहीं, याबद्दल आम्हास खात्री वाटते.

हैद्राबाद संस्थानात प्रकाशनाचें कटु अनुभव येणें साहजिक आहे. मराठवाड्यातील लोकसंख्या जरी सुमारें चाळीस लक्ष असली तरी शिक्षणाचें प्रमाण अत्यल्प असल्यामुळें, पुस्तकाचा खप फार कमी होतो. शिवाय पुस्तकाच्या विक्रीच्या बाबतींत व्हावा तसा प्रयत्न संस्थानात होत नाहीं. तसा प्रयत्न झाला तर कोणत्याहि प्रकाशकाची निराशा होईल असें वाटत नाहीं. शिक्षणाचें व योग्य प्रयत्नाचें प्रमाण जसजसें वाढेल तसतसें हें निराशेचें वातावरण निवळेल व आशेचें किरण दिसूं लागतील.

प्रस्तुत पुस्तक हैद्राबाद संस्थानांतील श्री. दिवाकर कृष्ण केळकर एम्. ए., एल्एल्. बी. या प्रथितयश लेखकाच्या लेखणींतून उतरलेलें आहे. त्यांच्या लघुकथा किती वाचनीय आहेत हें आम्ही नव्यानें सांगायास नकोच. त्याची समाधी व इतर सहा गोष्टी व किशोरीचें हृदय हीं पुस्तकें सहृदय वाचकांच्या वाचनांत आहेतच. त्यांच्या लेखनाची महति महाराष्ट्रातील सर्व थोर साहित्यिकांना पटलेली आहे. तेव्हां या पुस्तकाचें केवळ आमच्या संस्थानांतच स्वागत होईल असें नाहीं तर सर्व महाराष्ट्रांतहि त्याचें स्वागत झाल्याशिवाय राहणार नाहीं.

संस्थानांतील वाङ्मयाचा दर्जा ठरविण्याच्या दृष्टीनेंहि हें पुस्तक वाचकांना उपयुक्त वाटेल. खरोखरच मुद्रण स्वातंत्र्य जर संस्थानांतील लोकांना मिळालें तर अनेक लपलेलीं माणकें बाहेर येतील व येथील वाङ्मयाच्या प्राचीन उज्वल परंपरेंत भर घालतील. तो दिवस लवकर उगवेल अशी आशा आहे.

हें पुस्तक प्रकाशित करण्याचे कामी येथील सुप्रसिद्ध राष्ट्रीय कार्यकर्ते रा. **रामचंद्रराव अन्तु** हायकोर्ट वकील यांनी फार मोठी आर्थिक मदत केली याबद्दल मंडळ त्याचें आभारी आहे. त्यांच्या मदतीच्या अभावी हें पुस्तक प्रकाशित करणें आम्हास फार कठीण गेलें असतें. तसेंच श्री. य. गो. जोशी व आर्टिस्ट एन्. एम्. केळकर या दिवाकर कृष्णांच्या मित्रांनींहि या पुस्तकास आपुलकीनें मदत केली आहे. त्याबद्दल संस्था त्यांची फार आभारी आहे.

शेवटीं या व या पुढील प्रकाशनाच्या कामीं जनता जनार्दनरूपी परमेश्वर आम्हांस साहाय्य करो अशी प्रार्थना करून हे दोन शब्द संपवितो.

१२१४ सुलतान बाजार
हैदराबाद. ( दक्षिण )
२० आक्टोबर १९४१.

श्री. कृ. वाघमारे.
कार्यवाह, प्रकाशन विभाग.
वाग्विलास मंडळ.

वाग्विलास-प्रकाशनाचे

# एक प्रमुख आश्रयदाते



श्री. रा. रा. **रामचंद्रराव अन्तु,**

हायकोर्ट वकील ( हैद्राबाद दक्षिण )

# अनुक्रमाणिका




| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| १ | रूपगर्विता | ... | ... | ... | १ |
| २ | दंडकारण्यांतील प्रणयिनी | | ... | ... | १५ |
| ३ | आशाबंध | ... | ... | ... | ३३ |
| ४ | लोकनिंदितेचा व्रतभंग | | ... | ... | ४० |
| ५ | दीपगृहावरील मध्यरात्र | | ... | ... | ५३ |
| ६ | अनुराधेचें स्वप्न | ... | ... | ... | ६४ |
| ७ | मलयगिरीवरील वसंतकाल | | ... | ... | ७६ |

## श्री. दिवाकर कृष्ण यांची
# इतर पुस्तकें

१ समाधी व इतर सहा गोष्टी

२ किशोरीचें हृदय ( कादंबरी )

३ तोंड ही माळ ( नाटक )

---

वाग्विलास मंडळ ( दक्षिण हैद्राबाद )

प्रथम प्रकाशन

## मराठवाड्यांतील गद्यवाङ्मय

लेखक—कृष्ण कुमार एम्. ए.

किं. १। रुपया

# रूपगर्विता : : १

नाजुक ही राणी ऽ ऽ ऽ
घाबरि होय उन्हा ऽ ऽ ऽ नी
उमटेना बघ वाणी ऽ ऽ ऽ

आणि नंतर खूप हंशा; नंतर "चला ग, हें काय असलं!" नंतर वेडावणें. नंतर "इश्श ग बाई!" असा कांहीं प्रकार मुंबईतील एका बंगल्याच्या तिसऱ्या मजल्यावरील एका मोठ्या हॉलमध्यें चालू होता.

ते वसंतऋतूचे चैत्र-वैशाखांतले दिवस होते. लोक म्हणतात कीं, चैत्र वैशाख वसंतऋतु, पण त्या वेळची उन्हाची तिरीप, रुक्षपणा, उग्रपणा, घामाच्या धारा इत्यादिवरून कोणालाहि "मदनाचा मित्र इतका कठोर कां?" अशी सहज शंका यायची. सायंकाळची चारची वेळ होती. उन्हें

उतरत होतीं; आणि केर काढणाऱ्या व पाणी टाकणाऱ्या मोटारी इकडून तिकडे धावत होत्या. समुद्राकडून येणाऱ्या वाऱ्यानें उडविलेली धूळ मानवी प्रयत्न शान्त करीत होते. सकाळीं उषेशीं टेनिस खेळणारा, दुपारीं अवनीला त्रास देणारा; आणि संध्याकाळीं संध्येशीं नाचायला निघालेला निसर्ग, संभावित नागरिकाचें अनुकरण करीत होता. रस्त्यांतील रहदारी व त्याबरोबर खडखड व अशान्तता वाढत होती. श्रमजीवी आपापल्या परिश्रमगृहांतून हुश्श हुश्श करीत बाहेर पडत होते. सुखवस्तु आपल्या वामकुक्षीचें विसर्जन करून उपाहाराच्या विचारांत होते. समुद्रावरचा वारा वहात होता; पण परकीय राजसत्तेच्या प्रजानिष्ठेप्रमाणें वहात होता पण सुख देत नव्हता. वसंतऋतूंतला सूर्य चाणाक्ष राज्यकर्त्या-प्रमाणें सरळ ताप न देता आपले कर वांकडया मार्गानें घेत होता.

त्या वेळीं त्या हॉलमध्यें चैत्रागौरीची आरास मांडलेली होती आणि घरमालकीण व तिच्या कांहीं इष्टमैत्रिणी जमल्या होत्या. अजून बायका येऊं लागण्याला उशीर होता म्हणून हारतुरे, वेण्याफण्या लुगडी-चोळया वगैरे चालू असताना त्या एकमेकींची थट्टा करीत होत्या. एकमेकींची म्हणण्यापेक्षां एकीची म्हणणेंच जास्त योग्य होईल. कारण सर्वांचा रोंख एकीवरच होता. ती एकटीच कौतुक, विनोद, अभिमान, ईर्ष्या, असूया इत्यादिकांचा सर्वांना विषय होती. तिला त्या 'नाजुक राणी' म्हणून चिडवीत, रुसवीत व हंसवीत होत्या.

" अग, या पुणेकरणीला पाणी काय देतेस ? चहा देशील कीं नाहीं!" पुन्हां ती गाणारीण मैत्रिण म्हणूं लागली—

" प्रभात होता काहिं न सुचतें
अधण चहाचें तयार होतें
नामस्मरणहि दूर रहातें ! "

तसल्या त्या उकाडयात त्या सगळया पोरी चहा प्याल्या. त्यांच्या त्या नव्या साडया, वेगवेगळया वायलचे ब्लाउझ, यामधून वसंतांतील चंड-किरणांनीं उत्पन्न केलेले, चहादेवानें वाढविलेले घर्मप्रवाह केवळ कामी जनांना आल्हाद देणारा एक प्रकारचा गंध पसरीत होते. हळूहळू ऊन

उतरूं लागलें तशा बायका येऊं लागल्या. आणि त्या कामिनी या नाजुक राणीला सोडून त्यांना हळदी कुंकू द्यायला लागल्या.

अशी ही नाजुक राणी कोण आणि कुणाची? असा प्रश्न साहजिकच कोणाच्याही मनांत आला असता; आणि त्याप्रमाणें बंगलीच्यासमोरील फॅन्सी मालाच्या बोहऱ्याच्या दुकानांत आपल्या दाढीवरून हात फिरवीत बसलेल्या मौलवीच्या मनांत आलाही. त्यानें तिच्यावर पाळत ठेवली, पत्ता काढला, शोध घेतला. कशासाठीं तें त्याच्या जिवालाच माहीत.

* * *

ती पहिल्यानें सासरीं आली त्या दिवशीं त्याला देहभान नाहींसें झालें होतें. त्या दिवशीं दिवस उगवला नाहीं, घड्याळ चाललें नाहीं किंवा सूर्य मावळला नाहीं. तिचें नाव पद्मावती ठेवलें होतें; माहेरीं तिला आनंदी म्हणत. लोक म्हणत, ती पद्मीण आहे; आणि त्याला वाटे खरोखरीच तिच्या अंगाला कमलाचा सुगंध येई! ती ज्या मोटारींत बसून आली तिच्या गाद्या किती तरी राठ होत्या! ती जें मलमलीचें पातळ नेसली होती ते तिच्या नाजुकपणाच्या मानानें त्याच्या दृष्टीनें किती तरी जाडेंभरडें होतें! मस्तानीच्या गळयातून पीक दिसे तसे तिचे मनोविकार कातडीवर दिसत असत. तिच्या पायातील वहाणांची मखमलसुद्धा तिला बोंचत असावी!

घरांतील जमिनी जाडयाभरडया फरशीच्या केलेल्या होत्या; फर्निचरचें लाकूड मऊ नव्हतें. घरांतील लोखंडी पलंगाच्या जाळयासुद्धां कठीणशा लोखडी ताराच्या होत्या.

तिचे वडील रसिक होते आणि आपल्या मऊ, बारीक, व लांब केसाच्या निरनिराळ्या तऱ्हेच्या वेण्या कशा घालाव्या हें तिला कळत असे. तिच्या आईनें तिला घरकाम करायला शिकविलें नव्हतें. तिला स्वयंपाक करतां येत नसे, पण वाढता चागलें येई. तिला लिहितां वाचतां, शिवतां, विणता व गातां वाजविता येत होतें. तिला बोलतां चांगलें येई. ती लहान आवाजांत हळूहळू बोले. चालतांना तिचें पाऊल वाजत नसे. पण काम करतांना बांगडया वाजत!

ती प्रथम घरांत आली तेव्हां तो आपल्या खोलीच्या खिडकींतून पहात होता. शेजारणीची मुलगी दारापुढील गुळगुळीत फरशीच्या पायऱ्यांवर

तिची दृष्ट काढून तिच्या पायांवर पाणी घालीत असतां ती आपले ओले केंस आणि पदर सांवरीत होती. तिनें आपली चंचल दृष्टी एकच क्षण त्या खिडकीकडे स्थिर केली. खिडकीवर चढलेल्या वेलींच्या जाळींतून तिच्या नाकांतील हिऱ्याची मोरणी क्षणमात्र चमकून गेली.

त्याच वेळीं समोरच्या रस्त्यांत एक टक्कर झाली. दोन तरुण सायकलस्वार, एक स्वत: मोटार चालविणारे लक्ष्मीपुत्र आणि एक रस्त्यांतून (आ) करून चाललेले गृहस्थ एकमेकांवर आदळले. तो तिच्याचकडे केवळ पहात होता; पण क्षणापूर्वी जेव्हा तिनें वळून पाहिलें होतें तेव्हा त्या सर्वांची दृष्टी आपणांकडे आहे असें तिला दिसलें होतें. आणि हेंच त्या उत्पाताचें कारण असें तिच्या लक्षांत आल्याशिवाय राहिलें नाहीं.

ती लहान होती तेव्हां शेजारपाजारचीं मुलें तिची गट्टी संपादन करण्यासाठीं आपआपसांत मारामारी करीत. त्यांच्यापैकी कोणालाही आपली मुलगी देण्याची कल्पना तिच्या आईला खपत नसे. कारण तिला आपल्या अप्सरेप्रमाणें सुरेख मुलीच्या मानानें प्रत्येक मुलांत किंवा त्याच्या आईबापांत किंवा त्यांच्या सपत्तींत काहीं तरी वैगुण्य दिसतच असे व तें ती शेजारणीजवळ बोलून दाखविल्याशिवाय रहात नसे. आनंदीला आपण इतरापेक्षां श्रेष्ठ आहों एवढें ज्ञान त्या व्यवहारापासून झालें. इतर मुली तिला कस्पटासमान वाटूं लागल्या. गांवातील इतर लोक आपल्याभोंवतीं घिरट्या घेण्यासाठींच आहेत अशी तिची कल्पना झाली आणि आईचा अभिमान व बापाची काळजी वाढूं लागली.

एवंगुण अशी ती—तिचें नांव लोकांना माहीत नसेल पण तिचें रूप सर्वांना माहीत होतें. ती रेल्वेंतून ज्या डब्यात बसून जाई तिथें नेमकी गर्दी होत असे. तिच्या वडिलाचें नांव जितक्या लोकांना माहीत होतें त्यापेक्षां त्याच्या मोटारीचा नंबर लोकाना जास्त माहीत होता काहीं लोक केवळ तिला मोटारीच्या नंबरावरून ओळखीत. अनेकांनीं तिच्या गोड मोहकपणावरून तिचें 'पेपरमिंट' असें नांव ठेवलें होतें. रसिक तिला चंद्रावली म्हणत आणि काव्यांतील नायिकांचीं अवयव वर्णनें तिच्याशीं ताडून पाहिल्याचें कबूल करीत. कुणी तिला आंवळकाठी म्हणत; कारण तीं आपलें वस्त्र इतकें चापूनचोपून नेसे कीं, त्या तशा नेसण्यानें तिच्या

शरीराचे उंचसखल भाग स्पष्ट दिसून येण्यांतच मदत व्हावी. केवळ गणिती मनेंसुद्धा तिच्या चवळीच्या शेंगेसारख्या अंगयष्टीबद्दल तिला 'लॅम्डा' असें ( L या अक्षराचें ग्रीक नांव ) आवडतें नांव देत. तिची आई तिला बाबी म्हणे, मैत्रिणी आनंदी म्हणत, आणि पद्माकरानें लग्न झाल्यावर तिचें आवडतें नांव पद्मावती ठेवलें होतें.

अशी ही रूपगर्विता, जिच्या भाग्याबद्दल मैत्रिणी मत्सरी होत्या, रूपावर लुब्ध होत्या पण गर्वाबद्दल रुष्ट होत्या; जिच्यासाठीं तो बाहेरच्या दुकानातील मौलवी जिभल्या चाटीत होता. ज्याची ती आवडती, देवाब्राह्मणानीं दिलेली राणी होती, त्याला दुसरें कोणी नव्हतें; पण संपत्ती होती. आई तर जन्मत:च सोडून गेली होती. पण जगांतील नात्याचें महत्त्व कळूं लागण्यापूर्वीच त्याच्या बापानें बऱ्याच मोठया संपत्तीसह त्याला मागें ठेवलें होतें. कलेक्टररूपी कोर्ट ऑफ् वॉर्डस्नें त्याचा ऊर्फ त्याच्या संपत्तीचा सांभाळ केला. बोर्डिंगांत शिक्षण झालें. मोठया भांडवलामुळें व्यापारात प्रथम यश आलें आणि पूर्ण स्वातंत्र्यामुळें केवळ रूपवतीचीच वधू म्हणून निवड झाली.

तो श्रीमंत झाल्यानंतर त्याची कोणशी एक दूरची आते येऊन त्याच्याकडे राहूं लागली. आणि त्याची इतकी जिवापाड काळजी करूं लागली कीं भोळे म्हणू लागले, त्याची मेलेली आईच पुन्हा आली. आणि मैंद म्हणूं लागले, "या राजापुरी गंगेला आताच एकदम इतका पान्हा कसा फुटला ?"

त्यानें जेव्हा पहिल्यानें तिला पाहिलें तेव्हां ती वेणीफणी करीत होती. त्या वेळीं तो तिच्या वडिलांच्या घरांत धंद्याच्या निमित्तानें गेला होता. बाहेर व्हराड्यांत कोणी नाहीं असें पाहून त्यानें दिवाणखान्यांत डोकावलें. तिथेंही कुणी नव्हतें; पण माजघरांत चाहूल दिसत होती. त्यानें एकदोन लहान हाका मारून पाहिल्या, पण दाद लागेना तेव्हां तो दिवाणखाना ओलांडून माजघराच्या दारात आला; तिथलें तें रमणीय दृश्य पाहून तिथेंच थबकला, आणि आपलें स्वत्व आणि परकीयत्व विसरून कांहींच चाहूल न देता तें पहात राहिला.

माजघरांतील मोठ्या आरशापुढें ती आधुनिक तऱ्हेचें साहित्य घेऊन केंसाचें प्रसाधन करीत होती; त्यातील कांहीं नितंबावर आणि वक्षस्थलावर लोळत होते तर कांहीं फणीच्या दात्यांत नियमन पावत होते. तिच्या अंगांत केवळ स्तनाचेंच आच्छादन करणारा, पाठीवरून व खांद्यावरून पट्यांनीं बांधलेला पांढरा अंडरवेअर होता. त्यावरून नेसलेल्या क्रीम रंगाच्या मलमली पातळाचा पदर एका खांद्यावरून वहात होता; दुसऱ्या केवळ उघड्या गौर बाहूवर खिडकींतून येणाऱ्या कोंवळ्या उन्हाच्या कवडशाचें आक्रमण टाळण्यासाठीं कांहीं केंसाच्या बटा त्यावर रुळत होत्या. पद्माकराला वाटलें, त्याच्या अभिलाषाजनक मांसल गौरपणाला दृष्ट लागूं नये म्हणून त्या काळ्या केशपुंजांचें रक्षाबंधन केलें आहे. तीं स्वतःच्या रूपनिरीक्षणांत इतकीं गर्क होतीं कीं उभयतांना आपल्या आसपास कुणी सत्त्व आपलें कार्य करीत आहे याची जाणीव नव्हती. तें शरीरातील सत्त्व आपले धागे विणीत होते. पण त्याची चाहूल लागत नव्हती. त्यानें प्रत्यक्ष डोळ्यात जादू भरली पण दिसलें नाहीं; आणि अत्यंत आंतल्या झांकलेल्या, रक्षिलेल्या अंगाला स्पर्श केला पण सांपडलें नाहीं. ती गुणगुणत होती, अंगविक्षेप करीत होती, आणि गालातल्या-गालांत हंसतहि होती; कारण तिला खात्री होती कीं आपल्याला कोणी पहात नाहीं.

" वदन देखोनि रतिपति लज्जित

..........................

गमन देखोनि लपत । मराळ मानस सरोवरीं
क्षण एक चाले गजगती ।
कुरळ केश देखोनि भ्रमरपंक्ती ।
रुंजी घालिती सुवासा ! ।
पक्क डाळिंब बीज सुरत ।
त्यासि लाजविती जिचे दंत ।
कुच देखोनि कमंडलू शंकित ॥

.......................

त्या उभयतांच्या या समाधीचा भंग तिच्या पित्यानें केला. कण्वानें दुष्यंताच्या अपराधाबद्दल त्याला कन्या दिली होती. पण या गृहस्थांनीं स्वतःच्या या अपराधाबद्दल कन्या देऊन भरपाई केली.

पद्माकराचा एक बालस्नेही प्रभाकरनामें होता. त्यानें नुकतेंच लग्न केलें होतें आणि आपल्या वधूचें नाव प्रभावती ठेवलें होतें. हळदीकुंकवाच्या दिवशीं गाणारी, हंसणारी, चेष्टा करणारी मैत्रीण हीच प्रभावती होती. ती रूपानें चारचौघींसारखी, नाकाडोळ्यानें नीटस, रंगानें सावळी, ठेंगणीठुसकी, बोलकी, धीट, चुटचुटीत, पेटी वाजविणारी, गाणारी, शिकलेली, व्याख्यान देणारी, भाडणारी आणि रुसणारी होती. कुमारपणीं एके दिवशीं तिचें व्याख्यान प्रभाकरानें ऐकलें आणि तो इतका खूष झाला कीं त्यानें तिचें आवडतें नाव 'गजरघंटा' असें ठेवलें आणि मित्रमंडळीपैकीं एकाला याचें अनुरूप नांव शंख असें सुचलें. या सूचनेनें अभिलाषा उत्पन्न केली, तिच्या तीव्रतेनें मागणी करवली, पण मागणी आणि संमती यांतील अनुनयाचा दोन वर्षांचा काळ गेला.

काळ म्हणजे एक मोठी कहाणीच आहे. तो तिला प्रथमदर्शनीं आवडला कां नाहीं; केव्हां, कां आणि कसा आवडं लागला; तिनें त्याला किती वेळां आणि कसें नाकारिलें, आणि पुढें तिच्या अनुमतीला प्रेम कारण झालें कीं तारुण्य, इत्यादि शंसनीय विपुल आहे; पण एवढें सांगितलें म्हणजे पुरे आहे कीं पद्माकराला स्वतःला ती आवडत असून आपल्या मित्राला ती मिळावी म्हणून त्यानें महान् यत्न केला.

प्रभावतीचें लग्न आधीं झालें म्हणून ती वडिलकीचा मान घेऊन पद्मावतीची हवीतशी चेष्टा करी; पण आपल्या रूपाची ही अपन्हुत प्रशंसा तिला आवडतच असे· तिची वागणूक हळूहळू गर्विष्ठ आणि उद्धट होऊं लागली. त्यांत मनमोकळेपणा आणि प्रेम राहिलें नाहीं, तसें प्रभेनें त्या रूपगर्वितेची मस्करी करणें सोडून दिलें. तिला तिच्या या वागणुकीचें कारण कळेना. ही गट्टी तुटल्याबद्दल तिला हळहळ लागून राहिलीच.

हळदीकुंकवानतर फार थोडया दिवसांत हें स्थित्यंतर घडून आलें होतें. आणि इतरही किती तरी महत्त्वाच्या गोष्टी घडून आल्या होत्या. तो मौलवी वेळीं अवेळीं दिवसारात्रीं पद्माकराच्या घराभोंवतीं घिरट्या घालतांना

दिसूं लागला होता. घरांतही जरा बेदिली सुरू झाली होती. लग्नानंतर इतके दिवस खास झाले होते कीं वधूच्या लज्जाविनयादि अभिनयाचा अवसर जाऊन बरीच भीड चेपली जावी. पण पद्माकराला अनुभव वेगळा आला; त्यानें अनेकवार तिच्या जिवीं लागण्याचा प्रयत्न केला, पण त्याला जो प्रत्यवाय आला तो सरोमाच, सकंप आणि साभिलाष नव्हता. त्यामुळें त्याला स्वतःशीं पराजित झाल्यासारखें झालें होतें. पण कोणाजवळ सांगण्याची चोरी. एक नवयौवना आपल्या प्रणयाला स्वीकारीत नाहीं आणि रुक्ष, उन्मत्त गर्वनिर्भर रीतीनें वागते याचें त्याला कोडेंच उलगडेना. या Sex च्या विकृतीचें कारण शोधण्यासाठीं त्यानें बरीच Sexology चीं पुस्तकें चाळलीं, पण त्याला समाधानकारक कांहीं लाभलें नाहीं. त्यानें कुठेंसें वाचलें, "चुंबन हें मुखाचें सौंदर्य कमी करणारें आहे." त्याला वाटलें हा तर विचार तिच्या मनांत नाहीं?

त्यानें तिचे कांहीं कमी लाड केले नाहींत. ती म्हणेल तसें तिला वागूं दिलें. ती म्हणेल तसा खर्च केला. ती म्हणेल तिथें तिला नेलें. भुरळलेलें सुखातितृष्ण मन काय करणार नाहीं?

एकदा कुठेसें नाटकाला जायचें होतें. त्याला वाटत होतें की, तिनें टोपपदरीं लुगडें नेसावें. टोपपदरीं लुगड्यात ती कशी दिसेल, याचें त्यानें कल्पनाचित्रहि मनाशीं काढलें. पण ती म्हणाली, "तसलीं जाडी भरडीं भडक रगाचीं लुगडीं इतर बायकांनीं नेसावीं. मला स्वतःला काय चांगलें दिसेल तें पहायला नको का?

या आणि अशा अनेक गोष्टी त्याच्या विषादाला कारण झाल्या. एका इंग्रजी वर्तमानपत्रानें हिंदी स्त्रियांच्या सौंदर्याची चढाओढ लाविली होती; तें बक्षीस पद्मावतीला मिळालें. त्यानंतर पद्माकरानें उभयताचा फोटो काढण्याचा विचार पुढें मांडला. पण तिनें म्हटलें, "आपण एकमेकांना शोभत नाहीं."

कितीही आराधना केली तरी ही देवता हवी तशी प्रसन्न होत नाहींसें पाहून त्यानें आपल्या मित्राला या हकीगतींतील योग्य तो भाग सागितला, प्रभाकरानेंही तिच्या पोटांत शिरून काय तें कारण शोधण्याचें अभिवचन दिलें आणि त्याप्रमाणें त्यानें तिच्याशीं बोलणेंचालणें सलगीचें ठेवलें.

एके दिवशीं पद्माकर घरांत नसताना तो आला. खालीं आत्याबाईनें त्याला तसें सांगितलें, पण तो म्हणाला, " पण वहिनी तर आहेत ना ? तिच्याशीं बोलत बसूं. चला तुम्हीही वर. "

" नको रे बाबा ! ती म्हणते, मोठया आरशात तुमचं प्रतिबिंब फारच चमत्कारिक दिसतं. "

प्रभाकरानें तिला आग्रह करून वर नेलेंच.

" काय चाललं आहे वहिनीसाहेब ? " त्यानें दिवाणखान्यांत शिरतां-शिरतां विचारलें.

वहिनीसाहेब एका आरामखुर्चीवर वाचीत पडल्या होत्या. काय, तर पीअर्सचे ब्यूटी हिंटस् ! प्रभाकरानें सहज तिच्यावरून डोकावून पाहिलें. तिला वाटलें तो वाजवीपेक्षां जास्त जवळ आला. पण ती न उठता म्हणाली,

" काहीं नाहीं, आपलं उगीच काहीं तरी. "

" तुम्हाला करमतं कसं हो दुपारीं ? "

" नाहींच करमत; तुमच्यासारखं कुणी असलं बोलायला तर जाईल ना वेळ ! "

आरामखुर्ची हॉलच्या मध्यावर होती, पण तिच्यासमोर नीटसें बसायला कांहीं नसल्यामुळें तो इकडून तिकडे फिरत होता. थोडा वेळ थाबून म्हातारी मागच्यामागें निसटलीं.

" तुम्हाला काय हो कमी ? तुम्ही म्हणाल तितकी करमणूक. "

तिला वाटलें, आपल्या रूपावर लुब्ध होऊन हा आपल्याभोंवतीं घिरट्या घालीत आहे. तिला कसेंसेंच झालें व ती उठून बसली.

" परवाची बातमी तुम्ही लपवली तरी मला समजलीच. "

" कसली बातमी ? "

" Beauty competition मध्यें तुम्हांला बक्षीस मिळाल्याची ! "

" प्रभावतीलासुद्धां कळली का ती बातमी ? "

" नाहीं. "

तिचें मन जरा खट्टू झालें; पण संशय मुळें घेत चालला. थोड्या वेळानें खिडकीबाहेर पहात तो म्हणाला, " सौंदर्य ही एक ईश्वरी देणगी

आहे, पण तिचं सार्थक करणं मनुष्याच्या स्वतःच्या हातीं आहे." त्याला उत्तर न देणें अयोग्य झालें असतें असें वाटून ती म्हणाली, "तें कसं?"

"सौंदर्य दुसऱ्याला सुख देण्यासाठीं आहे, तेंच जर दुःख देऊं लागलं तर मग काय करायचं?"

प्रभावतीचीं खात्री झाली कीं, हा प्रच्छन्न शब्दांत प्रेमयाचना करीत आहे. तिला तसें वाटलें, ती रागानें लाल झाली आणि तो विचार तिच्या चेहऱ्यावर स्पष्ट उमटल्याशिवाय राहिला नाहीं.

त्याला वाटलें कीं आपण तिच्या व पद्माकरांच्या Relations ला reference दिला म्हणून ती रागावली आणि तो जास्तच बुचकळ्यांत पडला. तो स्वगत म्हणाला, 'आपण दुसऱ्याला दुःख देतो याची जाणीव मनुष्याला पुष्कळदा नसते.'

त्याचा भाव जाणण्यासाठीं म्हणून तिनें त्याच्याकडे पाहिलें. उभयतांची दृष्टादृष्ट झाली. तो अपराधी नव्हता तरी ओशाळला. एका तरुणीच्या नजरेला नजर देणें त्याला शक्य झालं नाहीं. त्यानें मान खालीं घातली आणि नकळत म्हटलें,

"माझं एक मागणं आहे."

त्याच्या कानांवर पुटपुटणें आलें. "विश्वासघात..." त्यानें वर पाहिलें तों त्याचे मागणें ऐकायला ती तिथें नव्हती. शेवटच्या अस्पष्ट शब्दानें त्याला झालेल्या विपर्यासाची पूर्ण कल्पना आली. त्यानें लगेच पद्माकराला ऑफिसांत जाऊन सर्व हकीगत सांगितली. त्याच्यावर त्याचा पूर्ण विश्वास होता. त्याला त्याचें कांहीं वाटलें नाहीं. पण दुसरे दिवशीं त्याचा हा विश्वास डळमळला. एवढेंच काय, पण स्वतःवरचा विश्वास उडाला. त्या दिवशीं रात्रीं पद्मावतीनें सांगितलें, "प्रभाकराची नजर वाईट आहे." तेव्हा तो हंसला पण दुसरे दिवशीं...

दुसरे दिवशीं तो ऑफिससाठीं घराबाहेर पडला. मोटार पद्मावतीनें नेली होती म्हणून वाटेंत टॅक्सी घेऊन जाण्याच्या विचारांत तो होता; पण समोर दोन माणसें बोलत चाललीं होतीं. त्यांचें भाषण याला महत्त्वाचें वाटलें म्हणून तो त्यांच्यामागोमाग चालूं लागला. त्यांपैकीं एक त्याच्या

घराभोंवती घिरट्या घालणारा मौलवी होता. आणि दुसरा शेजारचा एक सुतार होता. त्यांची अलीकडे बरीच गट्टी जमल्यासारखीं दिसत होती.

“अहो, ती तर अशी छटेल आहे म्हणता? बारा ×× चं पाणी प्यालेली.” सुतार म्हणाला.

“तुम्ही म्हणले ती आपले नवऱ्यावरची खुष नाहीं.” मौलवी विचारता झाला.

“कशी असेल? इष्काची बात कांहीं और आहे.”

“मग तुम्ही तर मजा लुटली म्हणता!”

“तर, काय इचारता राव!”

“मंग आम्हास्नी एकदा लावून द्या की, तात्या.”

“तुम्ही करा खटपट. तिचा तो नवरा पद्माकर बेटा पुरा ** आहे. अहो, ती काय वाटेल त्याला डोळा मारते; तुम्ही लावा ना एकदा हळूच हात—”

तो पुढें कांहीं बोलणार इतक्यात पद्माकराच्या बुटाची लाथ त्याच्या कमरेंत इतक्या जोरानें बसली कीं त्यासरशीं तो कोलांटी खाऊन उताणा फुटपाथवर आपटला आणि त्याचें डोकें फुटून रक्त वाहूं लागलें. तो बेशुद्ध झालेला पाहून मौलवीनें तेथून पळ काढला. ही गोष्ट दुसऱ्या कुणी पाहिली नव्हती. पद्माकरानें थोडा विचार केला आणि येणाऱ्या एका टॅक्सींत बसून तो निघून गेला. थोडया वेळानें लोक जमले आणि त्या सुताराला हॉस्पिटलमध्यें पोंचविते झाले.

त्या सुताराला ही मोठी नीच खोड होती. तो वाटेल त्या थोरामोठ्यांच्या बायकासंबंधीं खोट्यानाटया, घाणेरडया बढाया आपल्या स्नेह्यासोबत्या-जवळ सांगे आणि त्याचें प्रायश्चित्त त्यानें आज भोगलें. पण त्यानें पद्मा-कराला मात्र पागल बनविलें. त्याचा बायकोवरचा, मित्रावरचा, स्वतः वरचा आणि जगावरचा विश्वास उडाला. तिच्या सर्व वागणुकीचा या नव्या किळसवाण्या प्रकाशांत त्याला स्पष्ट अर्थ समजला. आशेचे सर्व डोलारे ढांसळले. तरी त्याच्या विवेकबुद्धीनें शिकस्त केली. त्यानें ऑफि-सांत आलेली मोटार ‘मला दुसरीकडे जायचं आहे’ असें सांगून पाठवून दिली. त्याची कल्पना कीं पद्मावती ती घेऊन कुठें तरी जाईल आणि मग आपल्याला घरीं जाऊन स्वस्थ पडून आपल्या भडकलेल्या मनाला शान्त

करतां येईल. असा विचार करून तो ट्रॅममधून ऑफिसांतून घराकडे निघाला. घरापाशीं येतांना त्याला दिसलें कीं पद्मावती आपल्या घरांतून निघून मोटारींत बसत आहे. फाटकापासून थोडया अंतरावर दोन तरुण उभे आहेत आणि एक दुसऱ्याला म्हणत आहे, "ती बघ! का, आहे कीं नाहीं लाखांत बायको! उगीच नाहीं इतक्या दूर आणलं तुला. तें बघ, बेटया, तुझं नशीब बलवत्तर आहे. वाः राव, तिनं तुझ्याकडे पाहिलं-सुद्धा! झाल नटण्याचंही काहीं सार्थक!"

पण इतक्यात पद्मावतीची मोटार निघून गेली. आणि ते दोघे तरुणही निसटले. कदाचित् त्याचाही कपाळमोक्ष झाला असता.

त्याच दिवशीं रात्रीं पद्मावतीला आपल्या खोलींत पलंगावर पाकिट सांपडलें. त्या पत्रांतील मजकुरानें तिला धक्का दिला. तें असें—

"पद्मावती,

माझ्या परत येण्याची आशा करूं नकोस. कशीही रहा, पण सुखी रहा म्हणजे झालें. मला जगाचा वीट आला आहे; आणि त्याला कारण तूं आहेस; पण—(यानंतर पुष्कळसा मजकूर लिहिला होता व खोडला होता. त्यात प्रेम, लग्न, पश्चाताप, सतित्व असे काहीं शब्द स्पष्ट दिसत होते) पुढें कधीं तुझे डोळे उघडलेच तर—(पुढें नुसत्या रेघोटयाच होत्या.)

— तुझा अभागी

पति"

ती सबंध रात्र तिनें जागरण केलें. आत्महत्येचा विचार केला. खोलीं-तील आरसे फोडून टाकले, डोकें आपटून घेतलें. तिच्या हृदयांत प्रकाश पडला, पण काय करावें हें सुचेना. रूपवतीच्या सर्व अभिमानाला आधार असें दुसरें काहीं असतें याची तिला जाणीव झाली आणि तिला आपलें कुठें चुकलें हेंही कळून आलें; पण काय उपयोग? गोष्टी इतक्या विकोपाला कशा गेल्या हें मात्र तिला कळेना.

रात्रीं तो नाशकाकडे जाणाऱ्या गाडींत बसला. त्याच्या डोळयांत दुःख, भिवयात तुच्छता आणि पापण्यात औदासिन्य वावरत होतें. त्याच्या समोरच्या बांकावर भायखळयाला एक मौलाना चढले, मोलवीच्या ध्यानांत

याची चलबिचल आली. खंडाळयाच्या घाटांत गाडींतून उडी टाकून मरावें असें त्यानें ठरविलें होतें. पण त्या दिवशीं दुर्दैवानें पिठासारखें चादणें पडलें होतें आणि घाटातील वनश्री इतकी नितान्त सुंदर होती कीं तिनें मरणाच्या कल्पनेऐवजीं त्याला आपल्या रूपवती भार्येचीच आठवण करून दिली. एकीकडे तिच्या विलासाच्या गोड कल्पना आणि दुसरीकडे स्वतःच्या उग्र निराशेच्या आठवणी यांचा परिणाम त्याच्या हालचालींवर होऊन तो नुसता चुळबुळ करूं लागला. मौलानाच्या सर्व लक्षात आलें. तो मोठा चाणाक्ष गोडबोल्याप्रमाणें मनकवडा होता. त्यानें आपण अमक्या ठिकाणचे काजी असल्याचें सांगितलें. त्याच्या पोटांत शिरून त्याची सर्व हकीगत काढून घेतली. त्याला आपल्याबरोबर नेलें, भूल-थापा देऊन आत्मसात् केलें. त्याला ज्याप्रकारचें सुख मिळालें नव्हतें तें देण्याचें अभिवचन देऊन धर्मान्तराला सिद्ध केलें. प्रभाकर अगदीं अवश होऊन गेला. त्याचा तोल राहिला नाहीं.

सबंध रात्र पद्मावतीनें रडण्यांत घालविली. दुसरे दिवशीं सकाळीं उठून ती प्रभाकराकडे गेली. तिनें त्याच्यापुढें तें पत्र टाकलें व आपलें मन मोकळें केलें. प्रभाकरानेंही अतिशय शोध केला पण पत्ता लागला नाहीं.

सुंभ जळला पण पीळ जळला नाहीं. तिनें स्वहस्तें आपल्या इष्टेटीची व्यवस्था लावली, आणि ती एखाद्या तपस्विनीसारखी राहू लागली. ती पांढरीं पातळें नेसत असे. तिची मुद्रा दीन, विषण्ण आणि विरागी दिसूं लागली. ती कुणालाही दर्शन द्यायला तयार नसे. मुंबई सोडून शान्तपणें ती नाशिकक्षेत्रीं येऊन राहिली.

झालें; छपरपलंग जाऊन त्या ठिकाणीं चटया आल्या; बिलोरी आरसे जाऊन तिथें पद्माकराचे फोटो आले. मोटारी जाऊन त्याऐवजीं देवब्राह्मण आले. मनोमन एकच आशा होती कीं, पतीचें कांहीं बरेंवाईट खास झालें नाहीं; आणि ते आपल्याला कधीं तरी भेटल्याशिवाय रहाणार नाहींत.

काहीं दिवसानीं तिथें एक साधू आला आणि तो पद्माकराच्या सर्व खाणाखुणा सागूं लागला कीं, मी त्यांची हरिद्वारीं भेट करवितों. पद्मावती बिचारी भुलली आणि फसली. पतीच्या दर्शनाच्या उत्कठेने निघाली ती तिच्या घराभोंवतीं घिरट्या घालणाऱ्या मौलवीच्या जाळयांत सापडली. तो

साधू दुसरा तिसरा कुणी नसून तोच होता. त्यानें जें तिला नेलें तें पद्माकराला आश्रय देणाऱ्या काजीकडे नेलें. पद्माकरासाठीं एक खूबसूरत बिबी आणून देण्याबद्दल काजीनें त्याला फार मोठी रक्कम कबूल केली होती; पण इष्ट स्थळीं जाऊन पोंचतांच फार विपरीत झालें. मोठ्या बक्षिसाच्या आशेनें आलेला मौलवी तुरुंगात गेला आणि यवननरपशूंच्या वासनेला बळी जाण्यासाठीं आलेल्या प्रभावतीला आपला हरवलेला पती भेटला. कारण काजीनें आपलें स्वरूप पालटलें. तो मौलाना नव्हता आणि काजीहि नव्हता. तो एक सत्पुरुष होता. स्वतःची रूपवती भार्या बदमाषाच्या कारस्थानांना बळी पडून संसाराची वाताहात झाल्यामुळें अशाच्या हातून इतरांचें संरक्षण करण्याचा विडा उचललेला तो एक योगी होता.

मौलवीच्या जबानींतच पद्माकराला स्वतःच्या वेडेपणाची खात्री पटली होती. सर्व स्थिरस्थावर झाल्यानतर पतिपत्नी एकत्र आलीं. तेव्हां त्यानें तिचा हात आपल्या हातांत घेतला. ती म्हणाली,

"मी अनंत अपराधी आहे."

"मी अतिशय अविचारी आहे."

"मला क्षमा केली ना?"

याचें उत्तर तिला मिळालें नाहीं. पण कसलासा चुक् असा आवाज झाला.

त्याच्या या आनंदाला कारण झालेल्या पुरुषानें जेव्हां निरोप घेतला तेव्हां उभयता ढळढळां रडूं लागलीं.

"महाराज, मी आपणासाठीं काय करूं?"

"सुंदर वस्तूंचें संरक्षण करा." तो महापुरुष त्यांना पुढें कधीं भेटला नाहीं. पण त्याचा संदेश त्यांच्या संसाराला जीवन देत राहिला.

ज्या चांदण्या रात्रीं पद्माकराची व त्या पुण्यपुरुषाची गांठ पडली त्या तिथीला ती उभयता गाडीनें खंडाळ्याच्या घाटात जातात आणि तिथल्या दरींत एक सुमनमाला टाकतात.

त्या दिवशीं ती त्याला अतिशय सुंदर दिसते!

# दंडकारण्यांतील प्रणयिनी : : २

फार प्राचीन काळीं—किती वर्षांपूर्वी हें जरी कुणाला माहीत नाहीं; तरी दंडकारण्याला आपलें नांव मिळालें नव्हतें, आर्य लोकाना तो प्रदेश पुरता माहीतहि नव्हता, आणि तेथें वसति करणारे-ज्यांना आर्य-उत्तरेकडून आलेले लोक दस्यू म्हणत--अजून जित होऊन या श्रेष्ठ पाहुण्यांचे गुलाम झाले नव्हते, आर्यांचें या दुर्गम घनघोर आणि भयप्रद प्रदेशावर आक्रमण चालू होतें,--अशा इतिहासपूर्व संक्रमणकालीं विंध्यगिरीच्या पूर्व टोंकाला कृष्णावेणीच्या उत्तरतीरावर मदनपल्ली म्हणून एक दस्यूंचें वसतिस्थान होतें. याच्या शेजारींच चार हाकांच्या अंतरावर या नदीला दुसरी एक नदी येऊन मिळून संगम झाला होता. या नदीचें नांव आज लुप्त झालें आहे, पण फार बारीक शोध करतां असें कळतें कीं, विश्वा

म्हसूसई असें म्हणत. या वसतीच्या आजूबाजूचा प्रदेश विरल व दाट झाडी, मोठमोठे पाषाण, लहान लहान टेकाडें, लहान लहान खिंडी इत्यादि निसर्गाच्या विविधतेनें भरलेला होता. विशेषत: उजव्या बाजूला म्हसूसई नदी एका मोठ्या डोंगराला खिंड पाडून एकदम कृष्णावेणीला मिळत असल्यामुळें ती जागा विशेषच रमणीय व भयप्रद होती. वसतीमध्यें उंचवटयावरून लहानमोठया पर्णकुटिका बांधलेल्या असून लोक नदीच्या काठीं पिकणारें एक प्रकारचें धान्य, वन्य फळेंमुळें आणि रानातील प्राणी यावर उपजीविका करीत. वसति आणि संगम याच्यामध्यें ताडासारख्या उंच वाढणाऱ्या कल्लुसंज्ञक मद्यार्क देणाऱ्या झाडांचें वन माजलें होतें. लोक मातीच्या भाड्यात हा मद्यार्क साचवून पीत, आणि धुंद होऊन नाचू गाऊं लागत. रोज सायंकाळीं हें रान तरुण दस्युकन्यांचें विहारवन होत असे.

"ती पाहिलीस का नीलम् येते आहे." अशाच एका दस्युकामिनीच्या समूहांतील एक म्हणाली. त्याच्या सर्वांच्या हातात मद्याचीं भाडीं होतीं. त्याचे घोट घेत घेत त्या आपापसात कलकलत होत्या. पलीकडे ठिकठिकाणीं पुरुष आणि स्त्रिया खात पीत, ओरडत-गात, शुद्धीवर आणि बेशुद्ध, अस्ताव्यस्त आणि सावरून पडल्या होत्या.

अशा त्या संस्कृतिपूर्वकालीन अपूर्व मद्यालयांत ती नीलम् उड्या मारीत आली. तिचे केस मोकळेहि नव्हते, आणि ती वेणी घालणेंहि जाणत नव्हती. तिचे अनावृत बाहू कृष्णसर्पाप्रमाणें इकडून तिकडे हालतांना शोभत होते. तिच्या अंगावर केळीच्या सोपटानीं चटईसारखें विणलेलें, डाव्या खांद्यावरून सोडलेलें, कमरेभोंवतीं घट्ट बांधलेलें वस्त्र होतें. तिच्या वेणीपेक्षा तिच्या नीटमपणाचेंच वर्णन करावें. तिच्या नाजुकपणापेक्षां तिच्या अंगसौष्ठवावर काव्यें करावीं. तिच्या तारुण्यापेक्षां तिच्या डोळयांतील पाणीदारपणाचें कौतुक करावें.

ती दस्युकुमारी आपल्या मैत्रिणींच्या घोळक्यांत येऊन पोंचली. तेव्हां त्यांपैकीं एकीनें तिच्यापुढें कल्लूचा लोटा केला. तिचे डोळे आधींच लाल झाले होते. तिनें एकीकडे तोंड केलें, दुसरीला हातानें नको म्हटलें

आणि तिसरीला हसत म्हणाली, "आपल्या गांवापाशीं यर्रा लोक आले आहेत बरं का ग?" (यर्रा म्हणजे आर्य किंवा गोरे.)

"मग आम्हाला काय त्यांच भय घालतेस?" त्यांपैकीं एक हातपाय आणि डोळे ताणून म्हणाली.

"ते म्हणे दस्यूंच्या पोरी उचलून नेतात आणि आपल्या देशांत कोंडून ठेवतात."

दुसरी म्हणाली, "मग मल्ली, तूं सांभाळ हो; नाहीं तर—"

पण नीलम्‌ला पुरती बोलूं न देतां मल्ली म्हणाली, "माझ्यापेक्षां तुलाच जास्त भीति आहे. तुझ्यावर तर सगळ्यांचा डोळा आहे!"

"तिला ग कशाची भीति? पल्लीपतीच्या पोराची ती आवडती आहे!" मल्ली म्हणाली.

"पण हिला कुठं तो आवडतो?" कोणशी म्हणाली.

"तो तर हिच्या मागंमागं फिरत असतो." पेटी म्हणाली.

इतक्यात तो जवळच झाडाआड एकीला दिसलाच.

"तो समोर पहा, तो तिथं आहेच तिच्या मागं तो!"

तो समोर आला; पण त्यांपैकीं कुणीच त्याला लाजली नाहीं किंवा उठली नाहीं किंवा सावरली नाहीं. उलटया सगळ्या त्याच्याकडे पाहून खोखो हसूं लागल्या. "तुला यायच आहे का नाहीं पलीकडल्या तीराला?" तो ओरडून नीलम्‌ला म्हणाला, "नदी भरली आहे, पुन्हा कुणी तुला पलीकडे नेणार नाहीं मी नाव घेऊन गेलों म्हणजे."

"पलीकडे काय करायचं आहे? तिकडे यर्रा आले आहेत ना? तुला माहीत नाहीं का?" मल्ली खरीच भिऊन म्हणाली. ती त्या सर्वांत लहान होती.

"यर्रांना कुणीहि द्रव्वी भीत नाहीं." तो छाती फुगवून आणि आपल्या हातातील कोयत्यासारखें हत्यार सावरून म्हणाला. द्रव्वी हा शब्द बलवान्‌ या अर्थाचाच वाचक आहे. "तिला आवडणारीं उसरीचीं फळं पलीकडच्या तीरावर आहेत तीं आम्ही घेऊन येणार आहोंत." असें म्हणून त्यानें येऊन तिचा हात धरला. त्याच्या उंच धिप्पाड बांधेसूद देहाकडे दुसऱ्या पोरी पाहत राहिल्या.

" मी नाहीं येत तुझ्या नावेंत!" तिनें आपला हात सोडवून घेतला. " तूं माझ्या अगदीं जवळ बसतोस आणि मला अडचण करतोस. तूं आपल्या नाव चालविण्याकडे लक्ष देत नाहींस म्हणून ती कुणीकडे तरी वाहत जाते आणि उशीर झाला म्हणजे आई करते पूजा!" ती डोळे मिचकावीत म्हणाली.

" आणि पलीकडे यर्रा आले आहेत, तूं जाऊं नको अक्का!" मल्ली तिच्याजवळ येऊन तिला ओढू लागली.

" तूं यर्रांना भितेस काय?"

" हो, भ्यायला बसलें आहे! हवं तर त्यांतल्या एखाद्याशीं लग्नसुद्धां करीन." नीलम्नें पाठमोरी होऊन मान वळवून त्याला खिजवण्यासाठीं म्हटलें.

त्यानें कोयता कमरेला खोचला; मल्लीच्या गालावर एक टिचकी मारली आणि नीलम्ला दोन्ही हातानीं उचलून तो नावेकडे चालूं लागला.

" पाहिलंस का नीलम्चं भाग्य?" त्यांतली एक कल्लूचें बोळकें ढोसून म्हणाली.

दुसरी एक उंच सुरांत गाऊं लागली:—

यर्रा आले बाइ गांवांत
रत्नम्माची सुंदर बेटी
चोरुन नेली मेल्यांनीं
गांवामधले वीर धावले
रक्ताचे बाइ सडे साडले

*　*　*

कोण ग काळ्या केसाची
लाल लाल डोळयांची
दिला देवीनं नवस तिला
केव्हा ग आलीस रानांतून?
पाणी का ग डोळयातून
कुठं ग बाई नीलम् गेली
पल्लीपतिपुत्राच्या गळयात—

ती जेव्हां हातानें ताल धरूं लागली तेव्हां तिसरी तिला म्हणाली,

" पुरे झाली तुझी कटकट! मला एक चांगलं स्वप्न पडत आहे."

नीलेच्या प्रियकरानें जेव्हां तिला उचलून नेलें तेव्हां ती त्याच्या गालावर चापटया मारूं लागली. त्यानें तिला नावेंत ठेवलें आणि नाव दूरपर्यंत नेली तेव्हां ती म्हणाली, " तूं मला का त्रास देत आहेस? मी कांहीं झालं तरी तुझ्याशीं लग्न करणार नाहीं!"

" का बर? मी तुझी किती तरी सेवा करीत नाहीं कां? हा पहा मी एखाद्या सेवकासारखा दूर बसतों."

" पण मी तुझ्याशीं लग्न करणार नाहीं."

" मी तुला आवडत नाहीं का?"

तिनें उत्तर दिलें नाहीं. नाव संगमाच्या मध्यावर आली होती. तो कांहीं तरी बोलणार इतक्यांत एक बाण येऊन त्या दोघांच्या मध्यें तळांत घुसला!

" अय्ययो " ती विवळली.

त्यानें वल्हें बाजूला ठेवलें, इकडेतिकडे पाहिलें आणि म्हटलें, " तें पहा, त्या पलीकडच्या झाडावरून एका यर्यानं तो बाण मारला आहे. तुला लागलं काय?"

" नाहीं, पण त्याचीं कुसळं पायाला बोचत आहेत."

त्यानें जोरानें तो बाण उपटून नदींत फेकला, पण तो भोंक पाडून गेला असल्यामुळें पाणी आत येऊं लागलें. त्यानें टाचेनें पाणी अडविलें आणि वल्हें मारूं लागला. पण दुसऱ्या बाणानें त्याच्या हातातलें वल्हें उडालें, त्यामुळें त्याचा झोक जाऊन तो नदींत पडला; आणि त्यानें नावेला धरण्याचा प्रयत्न केल्यामुळें नाव उलटली.

दुसरे दिवशीं सकाळीं पलीकडच्या तीरावर उतरलेल्या आर्यकुलाच्या पर्णागर्तेवर एका दस्युकन्येला आणून उभें केलें. कुलपति उच्चासनावर बसले होते. कुलगुरु कांहीं लोक बरोबर घेऊन समिधा आणण्यास गेले होते. ती दस्युकन्या नीलम् आपल्या अविहित माडयामध्यें हात जोडून खालीं मान घालून उभी होती. पुष्कळसे तरुण तिच्याभोंवतीं जमले होते. त्यातला एक तरुण तिच्या मागें उभा राहून विजयी मुद्रेनें तिच्याकडे व इतरांकडे पाहत होता. " वाहवा प्रवीर, वाहवा प्रवीर " असें कांहीं

म्हणत होते. कांहीं तिच्या निरनिराळ्या अंगांना स्पर्श करीत होते. त्यांतील एक कुलपतींकडे जाऊन म्हणाला, " कुलपतींच्या चरणीं प्रवीराची अशी विनंति आहे, कीं त्यानं जिंकलेली ही दस्युकन्या, इचं देवतांना यजन करून, त्याच्या स्वाधीन तिला करावी. "

" प्रवीरा, ही तुला कशी मिळाली ? " कुलपतींनीं विचारलें.

" एक दस्युहत हिला आपल्या नौकेंत घालून नेत होता. मीं बाणानं त्यांच्या नौकेला बुडविलें, आणि ही वाहत नदीतीराला आली. "

इतक्यात कुलगुरु आले. त्यांना सर्व हकीकत सांगण्यांत आली. त्यांनीं मान्यता देऊन यजनयोग्य अशी तिची स्नानादि शुद्धि करण्यासाठीं आपल्याबरोबरच्या शिष्यांपैकीं देवव्रत भार्गव नांवाच्या शिष्याचे स्वाधीन केलें, आणि सायंकाळीं होमाच्या वेळीं यज्ञस्थळीं उपस्थित करण्याची आज्ञा दिली.

इकडे मदनपल्लींतील मधल्या पटांगणात बरीच मंडळी जमली होती. पल्लीपति स्वतः झाडाला टेकून बसला होता, त्याचें अजस्त्र शरीर, लांब दाढी, उग्र चेहरा आज जास्तच चढलेला दिसत होता. त्याच्या पाठीमागें त्याचा पुत्र खालीं मान घालून उभा होता. समोर कांहीं मंडळींच्या घोळक्यात एक पोक्तशी बाई मोठमोठ्यानें बोलत व पुष्कळशा शिव्या देत आणि बोटें मोडीत होती. पलीकडे कांहीं तरुण आपापल्यांत कुजबुजत होते. कांहीं बायका एकीकडे जमून पाहत राहिल्या होत्या. नीलम्च्या मैत्रिणी त्यात होत्या. कडकडत होती ती नीलेची आई. तिला तेवढीच मुलगी होती. तिचा नवरा पूर्वी पल्लीपति होता, आणि आर्यांच्या हातून मेला होता. सर्वांत शक्तिमान् असेल त्याला पल्लीपति करण्याची वहिवाट होती. तो कल्लूचें झाड हातानीं हालवून उपटीत असे. आणि डाव्या हातांनीं मानगुटी दाबून शत्रूला मारीत असे. तें सगळें आठवून ती शोक करीत होती, आणि भोंवतीं जमलेल्या द्रव्वी तरुणांची निर्भर्त्सना करीत होती.

पल्लीपतीचा पहाडी आवाज वायूवर प्रतिध्वनित होतांच सर्वत्र शान्तता झाली.

" तूं तिला लगेच हात न देतां कशी वाहूं दिलीस ? " त्यानें मुलाला विचारिलें.

" ती बुडतांच दिसेनाशी झाली. आणि पुढं अंधार पडेपर्यंत मी तिला पाण्यात शोधली: पुन्हा सकाळीं मी शोधण्यास गेलों तेव्हा ती शत्रूंच्या हातीं दिसली. " त्यानें खिन्नपणें उत्तर दिलें.

पल्लीपतीनें करकरां दात खाल्ले आणि गर्जून म्हटलें, " जा, त्यांचा निःपात करा. "

" माझ्याबरोबर कोण येईल ? "

" मी येईन, मी नीलेसाठीं जीव वाहीन. " आणि सर्वांनीं त्याचा अनुवाद केला.

इतक्यात एक ओरडला, " ते पहा पलीकडच्या तीरावर यर्रा तिला घेऊन आले आहेत " आणि सर्वांचें लक्ष तिकडे वेधलें.

मध्यें नदी अथांग भरून वाहत होती. दस्यूंना आर्यांच्या तिरंदाजीचें फार भय होते; नाहीं तर आताच पोहून जाऊन त्यांनीं आपली ठेव हस्तगत करून घेतली असती. नीलेच्याबरोबर देवव्रत होता, आणि इतर सशस्त्र तरुण सरक्षणार्थ होते. प्रवीर नव्हता.

देवव्रताला दस्यूची भाषा येत होती. नदीच्या वाटेला लागतांच त्यानें नीलम्‌ला विचारलें, " तुझ नाव काय ? " ती स्तिमितच झाली. तिला कुणी असें विचारील अशी कल्पनाहि नव्हती.

" भिऊं नको, सांग तुझं नाव. "

तिनें त्याच्याकडे डोळे भरून पाहिलें आणि म्हटलें, " नीलम्. "

तोहि तिचें अथाग निरीक्षण करीत होता. नदीवर नेल्यावर तिला गोमयमृत्तिकादिकांनीं अभ्यंग स्नान घालण्यात आलें. शेवटीं तिला राहवेना. तिनें देवव्रताला विचारलें,

" माझ तुम्ही करणार तरी काय ? "

" हवन करणार. "

" म्हणजे काय, विस्तवांत टाकून देणार ? "

" तुला अग्नीभोंवतीं फिरवणार आणि मन्त्र म्हणणार. "

" आणि पुढ—"

" ज्याला तूं सांपडलीस त्याला देऊन टाकणार. "

" मग तो माझं काय करणार ? "

" उपभोग घेणार. "

" लग्न करणार नाहीं ? "

" दस्युकन्येशीं कुणी लग्न करतं का ? "

" मग मला त्याची सगळी सेवा करावी लागणार ? "

" होय. "

" पण आम्ही दस्युकन्या आपल्या इच्छेविरुद्ध कुणाला देह अर्पण करीत नाहीं. "

" पण ते तुला भाग पाडतील. "

यावर नीलम् काहीं बोलली नाहीं. ती दीन झाली. परत येताना ती सारखी त्याच्याकडे सतृष्ण पाहत होती, पण तिला बोलायला धीर होत नव्हता. झालें, दुपारचा वेळ तसाच गेला. तिच्या रक्षकांना यापैकीं एक अक्षरहि समजलें नाहीं. सायंकाळीं देवव्रत तिला वेदीच्या स्थळीं नेण्यासाठीं आला तेव्हां ती त्याचे पाय धरून म्हणाली, " मला एक भिक्षा घाला. "

" काय ? "

" मला या विटंबनेंतून वांचवा. इच्छेविरुद्ध भोग मरणाहून जास्त आहे. मला तुमच्या अग्नींत द्या. "

देवव्रताला आश्चर्य वाटलें, दुःख झालें, आणि तिची दया आली. दया ही प्रीतीचीच बहीण नव्हे का ? त्याच्या डोळयांत पाणी उभें राहिलें. आणि तिच्या पाण्यानें भरलेल्या डोळयाकडे पाहून त्याला कसेंसेंच वाटलें. यज्ञानंतर प्रवीर तिला घेऊन चालला तेव्हा पूर्वी दिलेल्या वचनाची आठवण देऊन दक्षिणा म्हणून ती दासी त्यानें मागून घेतली. ब्राह्मण आणि दासीशीं व्यवहार करणार ! सर्वांच्या दृष्टीनें तो हीन, पतित ठरला. प्रवीर तर जळफळूं लागला; त्यानें ब्राह्मण्याला दूषणें दिलीं. त्याला ती फार आवडली होती, तिच्याबरोबर करावयाच्या अनेक विलासांची त्यानें मनात कल्पना केली होती. त्या काळीं दासीगमन ब्राह्मणांना अगदीं निषिद्ध होतें; पण—

देवव्रतानें तिचा हात धरून तिला नदीतीरावर आणिलें आणि सांगितलें, कीं " तूं स्वतंत्र आहेस. आपल्या गांवीं जा." ती त्याला सोडून जायला तयार होईना. तिला जवळ ठेवण्यात आपल्याला केवढें पातित्य आहे हें त्यानें सांगितलें, आणि तिला मुक्त करण्यासाठीं आपल्याला लोकदृष्ट्या केवढें हीनत्व स्वीकारावें लागलें हेंहि सांगितलें; पण जायला तयार होण्याऐवजीं ती त्याला जास्तच बिलगूं लागली; कारण आपल्यासाठीं इतका त्याग करणारें तिला कुणीच भेटलें नव्हतें. शेवटीं मोठ्या कष्टानें त्यानें परत जाण्यासाठीं तिचें मन वळवलें. ती जायला निघाली. तिनें पाण्यांत उडी टाकली, पोहून परतीर गांठलें, असें पाहून तो परत गेला. पण ती गावात गेली नाहीं. ती परत नदी तरून आली; आणि तें अरण्य तिच्या पूर्ण माहितीचें असल्यामुळें प्रियेप्रमाणें देवव्रताच्या मागोमाग राहूं लागली.

दिवसां लढाई करून आपल्याला आर्यांच्या तिरंदाजीपुढें यश मिळणार नाहीं असें पाहून पल्लीपतीनें रात्री छापा घालण्याचें ठरवलें. मध्यरात्रीच्या सुमारास असंख्य धाडसी द्रव्वी वीर, कोयते कमरेला बांधून नदी तरून आले. आर्यांच्या तळावर कांहीं जागे होते पण बाकीचे निजलेले होते. मध्यें मात्र संध्याकाळीं पेटविलेले पांच अग्नी धडधडत होते. द्रव्वी आले ते आर्यांना जागे होण्याचीसुद्धां फुरसद न देतां त्यानीं जो दिसेल त्याला कापून काढण्याचा किंवा अग्नींत फेकून देण्याचा धडाका चालविला. या टोळीचा पुढारी पल्लीपतीचा मुलगा होता. तो या संहारामध्यें रुद्रासारखा तापत होता. त्यानें दोन आर्य फरफरटत आणले आणि अग्नींत टाकून म्हटलें, " ज्या अग्नींत तुम्हीं माझ्या नीलेला टाकून दिलंत त्यांतच तुमची सर्वांची आतां आहुति देतों." हें कृत्य नीलम् लपून पाहत होती. तिनें धावत जाऊन देवव्रताचें कुटिर गाठलें.

एका बाजूच्या झाडींत देवव्रताचें कुटीर होतें. त्याच्या आंत गवताच्या शय्येवर एक सुंदर तरुणी निजलेली होती. दाराशीं देवव्रत पहारा करीत बसला होता. नीलम् त्याच्याजवळ धावत आली आणि म्हणाली, " चला, माझ्याबरोबर चला, नाहीं तर तुमचं रक्षण होणं शक्य नाहीं. आमच्या लोकांनीं तुमच्या यज्ञाचा संहार केला आहे. उठा लवकर—"

देवव्रताचा या गोष्टीवर विश्वास बसेना. त्यानें खात्री करून घेण्यासाठीं एका उंच झाडावर चढून पाहिलें. तों बहुतेक लोक मृत्युमुखीं पडले होते आणि उरलेले सैरावैरा पळत होते. तो खालीं येऊन म्हणाला, "मी येऊ शकत नाहीं, मजजवळीचा ठेवा कुठें ठेवू?" त्यानें कुटिरांत निजलेल्या तरुणीकडे बोट दाखविलें. त्याच वेळी अग्नींतील एक कोलीत पेटलें आणि त्याचा प्रकाश तिच्या तोंडावर पडला.

नीलम् तिचें लावण्य पाहून चकित झाली. क्षणभर ती विचारांत पडली. तिनें तिच्याकडे व देवव्रताकडे पुन: पुन: पाहिलें; आणि शेवटीं ती म्हणाली, "तुमचा हा ठेवा आपण घेऊन जाऊं." त्याचें हें बोलणें होत आहे तों जवळच माणसाची चाहूल ऐकूं आली. त्यासरशीं तिनें जाऊन त्या सुप्त तरुणीला उचललें आणि देवव्रताला आपल्या मागें येण्यास सांगून ती चालती झाली. देवव्रत एखाद्या मंत्रमुग्धाप्रमाणें तिच्यामागें गेला.

नीलम्च्या घरीं रक्षिलेलीं हीं दोनच आर्य माणसें त्या प्रदेशात राहिलीं. या संहाराचें भय बसून पुन्हा आर्यकुल या बाजूला आलें नाहीं. केवळ नीलम्च्या आग्रहास्तव त्यांना जीवदान आणि स्वातंत्र्य देण्यांत आलें. तीं उभयता तिच्यापाशीं राहिलीं. या गोष्टीला किती तरी काळ लोटला.

नीलम्च्या घरीं राहिलेली ती गौरांगी त्या सर्व दस्युसंघात अभिलाषविषय होऊन बसली; त्यामुळें तिचें रक्षण करणें देवव्राला अतिशय कठीण होऊ लागलें होतें. पल्लीपति मरून त्याच्या जागीं त्याचा मुलगा सर्वांत बलवान् म्हणून पल्लीपति झाला होता. त्याच्या आधी त्यानें एका मोठ्या सुसरीच्या दाढा धरून तिला नदींतून बाहेर ओढून काढलें होतें. नीलेवरची त्याची निष्ठा कायम होती. तिला प्रसन्न करण्यासाठीं तो सारखा झटत असे; पण ती शक्य तों त्याला टाळी.

देवव्रताचा तो जीवरक्ष्य ठेवा, ती मोहक तरुणी—ती अतुललावण्य आर्यकन्या—तिचें नांव ऋता होतें. तिच्या रक्षणासाठीं त्याला सदैव धनुष्य बाधून तिच्याभोंवतीं भोंवतीं राहावें लागे. तिला बोलण्याचालण्याला, जीवाभावाला त्या पल्लीमध्यें तो एकटाच होता. त्याच्याशिवाय तिला क्षणभरहि राहवत नसे. दस्यूंची भाषा शिकेना, त्यांच्या बायकातून वागेना, त्यांचें फल्लु सशक मद्य पिईना; झोंपडींत बसून असे, किंवा रानात हिंडे फुलें-

फळें तोडी, बोलली तर देवव्रताशींच बोले, त्याच्याबरोबर जाई. त्यालाच आपल्या लीलांनीं रंजवी, आणि नीलम्--जिच्यासाठीं स्वतः महाबली पल्लीपति अधीर होता, तिच्यासाठीं एका सबंध आर्यकुलाचा संहार झाला, जिच्या लावण्याची सबंध द्रव्वीमंडलांत ख्याति होती--ती नीलम् देवव्रताला एक क्षणभरहि विसबत नसे. जणु काय तिचा तो बंदीच होता; आणि त्याच्यावर नजर ठेवली नाहीं तर तो पळून जाईल.

एके दिवशीं सूर्योदयाच्या वेळीं देवव्रत नदीकांठीं भगवान् सूर्यनारायणाला अर्घ्यादि समर्पून संध्यावंदन करीत होता.

त्यानें प्रातःसंध्येचें ध्यान केलें--

प्रातःसंध्यां बालां बालादित्यमंडलमध्यस्थां रक्तवर्णां रक्ताम्बरां रक्तानुलेपनस्रगाभरणाम् ॥ पण त्याच्या समोरच्या पाण्यात त्याला वेगळेंच प्रतिबिंब दिसूं लागलें. त्याला पाण्यांत दिसूं लागलेली मूर्ति श्यामा, अल्पाबरा, श्वेतपुष्पस्रगाभरणा अशी होती. तिनें हसत येऊन त्याचे डोळे झाकले. जणूं काय माझें ध्यान करूं नको असेंच तिनें सांगितलें. त्यानें वळून पाहिले तों तिनें आपले ओठ त्याचे ओठावर ठेवले. अजून उजाडलें नव्हतें; प्रकाश आणि अंधःकार यांचा संगमच झाला. तिनें आपले बाहू त्याच्या गळयाभोंवतीं घातले. प्रकाशानें नीलवलयाचें आवरण घेतलें.

"हें काय केलंस ? मी देवकार्य करीत होतों."

"मग हें तरी देवकार्यच आहे. आपण काय करीत होतां ?"

"मी संध्या करीत होतों."

"संध्या म्हणजे काय ?"

"संध्या-म्हणजे--म्हणजे—एकत्र येणं, मिळणं, संगम."

"मग मीं तरी तेंच केलं."

"तूं माझ्या धर्मकृत्यात अडथळे करूं नकोस."

"मला आपलीं धर्मकृत्यं शिकवा."

"तुझी जात वेगळी, धर्म वेगळा; देव वेगळे, उपासना वेगळी; तुझं आमचं कसं जुळेल ?"

"तुमच्या जातींत बायकापुरुष नाहींत का ?"

"आहेत."

" तुमच्या धर्मात, संस्कृतींत, प्रेम करीत नाहींत का ? करतात ना ?"

" होय."

" तुमच्या कुलांत लग्न करीत नाहींत का ?"

त्यानें उत्तर दिलें नाहीं. तिनें त्याच पुन्हा एकदां चुंबन घेतलें आणि ती पळून गेली.

त्या दिवशीं संध्याकाळीं त्याला आपलें पर्णशय्यास्थान शृंगारलेलें दिसले. त्याला वाटलें हें त्या नीलम्‌चेंच कार्य आहे. चांदणें पिठासारखें पडलें होतें, पण त्यामुळेंच देवव्रताला झोंप येईना, कदाचित् काळाकुट्ट अंधार असता तर त्याला झोप आली असती ! नीलम्‌नें त्याला संकट घातलें होतें.

त्याचें एक मन त्याला म्हणत होतें, 'जर तूं नीलम्‌वर प्रेम करतोस तर तिला सुखी कर.' पण त्याचा उच्चकुलाचा अभिमान म्हणत होता, 'काय, दस्युकन्येशीं विवाह ! अब्रह्मण्यम् !' दुसरें मन म्हणत होतें, 'मग ऋतेची काय वाट होईल ? तिच्या संरक्षणाची जबाबदारी तुझ्या हातून नीट पाळली जाणार नाहीं.' त्याच्या डोळ्यासमोर नीलम्‌च्या उपकाराचीं चित्रें येऊं लागलीं. ऋतेला घेऊन ती नदी तरून आली कुणासाठीं ? त्या संहारातून आपलें तिनें संरक्षण केलें कशासाठीं ? अनेक प्रसंगीं ऋतेची अब्रू तिनें पराक्रमानें दस्यूंच्या हातून वाचविली ती का ? आता त्याला जागेपणीं स्वप्नें पडूं लागलीं. नीलम् एका झाडावर चढली असून आपण खालीं उभे आहों. तिनं कसलींशीं फळं गोळा केलीं असून तीं ती आपल्याला देत आहे. ती स्वतः अर्धें फळ तोडून खाऊन उरलेलें अर्धें आपल्या तोंडांत घालीत आहे. आणि आपल्याला दस्यूंच्या देवतांची एक फार मनोरंजक कथा सांगत आहे. " एकदा भवदेवानीं भवानीला सोडून दिलें आणि विरक्त होऊन ते तपाला बसले. आमची देवी जातीची द्रवीच आहे. तेव्हा तिच्यासाठीं आमचा जो कामदेव, जो मनुष्याला स्त्रियाविषयीं आसक्त बनवितो त्या वनात जाऊन महादेवाना मोहित करण्याचा प्रयत्न करू लागला—आम्ही देवाच्या लिंगाचें पूजन करितों—कामाची बायको रति--बेलाचें पान देवाला आवडतें—त्या स्वप्नांत त्याला झोंप लागू लागली. इतक्यात कुणाचा तरी मऊ स्पर्श त्याच्या शरिराला झाला; त्यानें त्याला अतिशय सुख झालें.

खास ती नीलम् असली पाहिजे. त्या सौख्याचा कदाचित् भंग होईल म्हणून त्यानें डोळे उघडले नाहींत. त्यानें आपले बाहु पसरले आणि तिला हृदयाशीं घट्ट धरणार--इतक्यांत ती त्याच्या कानाशीं लागून म्हणाली--उपोप मे परामृश न मे दभ्राणि मन्मथा."

देवव्रत हे शब्द ऐकून चमकला. खास ती नीलम् नव्हती. आर्यांची भाषा बोलणारें त्या ठिकाणीं ऋतेशिवाय दुसरें कोण होतें ? त्यानें डोळे उघडून पाहिलें तों ऋताच त्याला बिलगून होती. तो चटकन् उठून बसला आणि म्हणाला, " हें काय ऋते ? "

" मला आता राहवत नाहीं."

" म्हणतेस तरी काय तूं ? "

" माझा जायात्वानं स्वीकार कर."

" शान्त हो, तू माझी बहीण आहेस; आपण एका गोत्रांतले आहों."

" मग आतां मी काय करूं ? "

देवव्रताला या प्रश्नानें सुन्न करून सोडलें. तिनें काय करावें ? ऋतेनें काय करावें ? एखाद्या दस्यूशीं तिनें लग्न करावें ही कल्पनासुद्धां त्याच्या आर्यमनाला सहन होईना. स्वतः दस्युकन्येचा स्वीकार करण्याच्या कल्पनेहून ती उग्र होती. तरी पण त्यानें म्हटलें,—

" एखाद्या दस्यु—"

तिनें अत्यंत तिरस्कारानें म्हटलें, " एखादा पशु— "

देवव्रताला काय करावें सुचेना. तो म्हणाला, " बहिणभावांचा संबंध ! शी: शी—"

" सृष्टीच्या आधीं नाहीं का बहीणभावांचा संबंध झाला ? यमीनें नाहीं का यमाचं आराधन केलं ? नाहीं तर मला मारून टाक ! " ती म्हणाली.

जिवापलीकडे जिचें जतन केलें तिचें आतां काय करावें हें त्याला समजेना. " तूं इथं नीज, मी पुन्हा परत येतों. " असें सांगून तो निघून गेला. उरलेली रात्र त्यानें कशीबशी घालविली. सकाळीं त्याला संध्यावंदन सुचलें नाहीं. नीलेचें काय करावें ? ऋतेचें काय करावें ?, का स्वतःचें काहीं तरी बरेंवाईट करावें ? मग ऋतेचें काय होईल ? नीलम् काय करील ?

स्वसेशीं विवाह करावा कीं अनार्यापाणिग्रहण करावें ? का स्त्रीहत्या, आत्म-हत्या आणि वंशक्षयाला कारण व्हावें ? काय करावें ? काय करावें— ?

त्यानें नदीतीरीं जाऊन स्नान केलें, नित्यकर्म संपवून वरुणाचें आराधन केलें.

" जिथें-तिथें, हे वरुणा, तुझे दूत तुझे नियम लोकांकडून पाळविण्यासाठीं लोकीं लोकीं फिरत असतात. "

" मला सोडू नको, नाहीं तर तुझ्या आज्ञा न मानल्याबद्दल जे लोकाचा नाश करतात त्यांच्या रागाला बळी जाईन. "

" माझे मन दुष्कृतीपासून वळव, जसा रवि आपल्या अश्वाला वळवितो; माझ्या वंशाचें रक्षण कर, आणि माझ्या व्रताचें रक्षण कर. तू जसा शासन करणारा आहेस तसा क्षमा करणाराहि आहेस. "

" तूं जर आपल्या भक्ताना दुर्धर डोंगरांतून मार्ग दाखवितोस तर मला या संकटांतून का मार्ग दाखवीत नाहींस ? "

वरुणानें त्याची प्रार्थना ऐकली कीं नाहीं कुणास ठाऊक, पण कांहीं दिवस त्याला व ऋतेला एकमेकांपुढें लाजिरवाणे असे गेले. ऋतेची अधीरता सारखी वाढत गेली, आणि ती तिच्या वागणुकींत आणि चेहऱ्यावर प्रतीत होऊं लागली. देवव्रत आतां आपला झाला म्हणून जितकी ती दस्युकुमारी नीलम् निश्चिंत होती तितकीच जास्त अशान्तता त्याच्या मनाशीं वाढत गेली होती. आता ती पल्लीपतीला टाळीनाशी झाली. केव्हां तरी त्याला हें गोड सत्य सांगून टाकण्याचें तिनें ठरवलें.

एके दिवशीं संध्याकाळीं नदीच्या काठच्या वेळूच्या बेटाच्या बाजूला देवव्रत आपलें धनुष्य घेऊन निभ्रान्त फिरत होता. त्या बाजूला कोणी सहसा येत नसे. त्यामुळें तो स्वस्थपणें आपल्या भवितव्यासंबधीं विचार करीत होता आणि संध्याकाळ होत होती. त्या वेळूच्या बेटांत चाहूल लागली म्हणून त्यानें आपलें शस्त्र सावरलें. आणि थोडा पुढें होऊन काय श्वापद आहे हें पाहू लागला. तों त्याला पल्लीपति व नीलम् दोघें आपापसांत मोठ्यानें बोलताना दिसले. चोरपावलीं जवळ जाऊन तो ऐकूं लागला.

" आता यापुढं मी जास्त वाट पाहणार नाहीं. "

" पाहूंच नको, मीं दुसऱ्याला वरलं आहे. "

" तूं माझ्यावर प्रेम केलं नाहींस काय ? "

" मुळींच नाहीं. मी तुला आधींपासून सांगत आलें आहें. तूं उगीच कष्टलास ! "

" असा तो आहे तरी कोण ? "

" सांगत नाहीं. "

" तुला सांगितलं पाहिजे. "

" ज्या आर्याला मीं तुझ्या हातून वांचविलं तोच. "

" तो वैरी तो तस्कर ! त्याच्यात तूं काय पाहिलंस ? "

" जें तुमच्यात नाहीं तें. पुण्य आणि प्रेम ! "

" मग मी प्रेम करीत नाहीं काय ? "

" पुण्यमय प्रेम ! "

पल्लीपति लाल झाला. तो म्हणाला,

" मी तें काहीं जाणीत नाहीं. मला तूं हवी आहेस, आणि आतां या क्षणीं–" असें म्हणून त्यानें एक हिसडा देऊन तिचें वस्त्र फाडून दूर फेकून दिलें, आणि तिला धरणार इतक्यांत त्याच्या पाठींत एक बाण येऊन घुसला व तो उताणा पडला. तो बाण त्याच्या छातींतून बाहेर आला.

ती दस्युकन्या नीलम् घाबरली, गोंधळली, लाजली आणि आनंदित झाली. पल्लीपतीनें तिचें नांव घेत तिच्याकडे पाहत तिचीच अभिलाषा धरून प्राण सोडला. देवव्रत पुढें येताच तिनें चटकन् तें फाटकें वल्कल स्वतःभोंवतीं धरलें. बाण मृताच्या छातींतून उपसला, आणि त्याला मागें येण्यास सांगून तिथून पाय काढला.

झोपडींत येऊन पोहोंचेपर्यंत रात्र झाली होती. घरांत येतांच त्याच्या पायाला विळखा घालून ती म्हणाली,

" जा, कुठं तरी दूर जा. रात्रीतल्या रात्रींत इथून दुसरीकडे जा. पल्लीपतीला बाणानं मृत्यु आलेला पहातांच दस्युसंघ तुम्हांला जिवंत ठेवणार नाहीं."

" तुला सोडून कुठं आणि कसा जाऊं ? "

" इतकं माझं भाग्य आहे का ? "

" पण तूं आपल्या आप्तेष्टांना सोडून कशी येशील ? "

" मला इथं कोण आहे ? एकटी आई होती तीहि मरून गेली."

" तूं आमच्यासाठीं वनवासाचे कष्ट सोसणार ?"

" मला वनाची फार माहिती आहे. मी आपल्याला सुरक्षित दूर नेऊं शकेन."

" ऋतेचं कसं होणार ? तिला कष्ट होतील आणि......"

त्याला कसली आठवण झाली. तो एकदम विचारांत कां पडला हें तिला कळेना. तिनें जरा धीट होऊन विचारलें,

" मग माझा स्वीकार केला ना ?"

तिला उत्तर मिळालें नाहीं; पण काय हवें होतें तें मिळालें. मध्यरात्रीला त्या तिघांनीं तें मदनपल्लीचें वसतिस्थान सोडलें. ताऱ्यांच्या प्रकाशांत त्यांना वाट दिसली आणि वनातील देवतांनीं त्याचें रक्षण केलें.

थोडया वेळानें चंद्र उगवला. एकाएकीं आपण अपरात्रीं कुठें आणि कां जातों हें ऋतेला कळलें नाहीं. तिच्या पायाना नीलेनें वनस्पतींचीं खोपटें बांधलीं होतीं त्यामुळें त्यांना इजा झाली नाहीं. पण चालण्यामुळें तिला शीण आला. झाडींतून उघडयावर येईपर्यंत देवव्रताला तिला उचलून घ्यावी लागली. ऋतेला त्या वेळीं किती तरी बरें वाटलें. भीतीमुळें जणुं काय ती त्याला अगदीं बिलगली. पण त्याला कसेंसेंच वाटलें नीलम् त्याच्याशेजारीं चालत होती. तिला काय वाटलें हें पाहणारें त्या गर्द झाडींत कोण होतें ?

त्या रात्रीं त्या उघडया मैदानावर त्यांनीं वसति केली. दुसरे दिवशीं सबंध त्याना चालावें लागलें. संध्याकाळपर्यंत त्या वनाच्या सीमाप्रान्तावर त्याना पोंचणे भाग होतें. वाटेंत त्यांना एकदा पल्लीपतीची हत्या करणाऱ्या आर्यनष्टाच्या शोधांत निघालेले लोक भेटलेच; पण नीलेनें एक अगदींच आडवाट धरून त्याना चकविलें. एक भरलेली नदी तरून जायचें होतें. तर ऋतेला एका ओंडक्याला बांधून नीलम्नें पैलतीरीं नेलें. संध्याकाळीं तें वन ओलांडून ते विंध्यगिरीच्या दक्षिण पायथ्याला आले. नीलम्नें एक दीर्घ नि:श्वास सोडला व म्हटलें, " आपण आता द्रव्वींच्या हातांतून सुटलों. पण यापुढं मला माहिती नाहीं." त्या रात्रीं तेथें विश्रान्ति झाली. दुसरे दिवशीं उजाडताच देवव्रताला आपण पूर्वी आर्यकुलाबरोबर इथून

गेल्याचें आठवलें, व त्या अनुरोधानें तो त्या दोघींसह डोंगर चढूं लागला. वन्य फळेंमुळें भक्षण करावीं, झाडाखालीं रहावें, हळुहळू मार्ग आक्रमावा असें चाललें होतें.

अशीच एक खिंड चढून ते वर आले होते. सूर्य अस्ताच्या बाजूला फार कलला असल्यामुळें पुढें जाणें शक्य नव्हतें. एका जलाशयाच्या शेजारीं त्यानीं राहण्याचें ठरविलें. नीलम् जवळपासचीं फळें गोळा करण्यास गेली. देवव्रत तिथेंच बसून राहिला. ऋता जलाशयावर पाणी पिण्यास गेली.

चढण्याच्या श्रमानें तिला फार थकवा आला होता. पाणी पिऊन आल्यावर ती त्याच्याजवळ आली आणि म्हणाली "पल्लीपतीला कशासाठीं मारलं ?"

देवव्रतानें उत्तर दिलें नाहीं. ती तिथेंच आडवी झाली व आळोके पिळोके देऊं लागली.

"नीलम् किती तरी चांगली आहे, नाहीं ? आपल्यासाठीं ती किती श्रम करते ?"

- देवव्रतानें उत्तर दिलें नाहीं.

"आता तिला आपली भाषा येऊं लागली. मला ती म्हणत होती, ऋते, तूं किती गोड आहेस." देवव्रत खळखळणाऱ्या ओढ्याच्या पाण्यावर उन्हानें जी चमक उत्पन्न केली होती तिकडे पाहत होता.

"ती मला फार आवडते."

देवव्रतानें एकदां तिच्याकडे वळून पाहिलें ती त्याच्या जवळ सरकून म्हणाली, "मी तुझ्या अंकावर डोकें ठेवून निजूं का ?"

त्यानें काहीं उत्तर दिलें नाहीं; पण तिनें जेव्हां त्याच्या अंकावर डोकें ठेवलें तेव्हां त्यानें तिच्या केसावरून हात फिरवला. थोड्या वेळांत तिला गाढ झोंप लागली.

अस्ताला जाणाऱ्या सूर्याचे किरण तिच्या डोळ्यांवर आले म्हणून ती जागी झाली. तिच्या कानावर काहीं शब्द आले; पण त्याचा तिला अर्थ समजला नाहीं. तिनें किंचित् मान वळवली, डोळे उघडले आणि पाहिलें, कीं नीलम् धांवत येऊन त्याच्या दुसऱ्या अंकावर बसली. तिनें काहीं

फळें त्याच्या तोंडांत घातलीं व तें बंद केलें. " हीं तुसरीचीं फळं बरं का, मला फार आवडतात तीं !"

तो तिच्या गालावर कुजबुजला,

" ऋता माझ्याजवळ निजली आहे ना ?"

त्या दोघाचीं मुखें आपल्याकडे वळत आहेत असे पाहून ऋतेनें डोळे मिटून घेतले. देवव्रतानें तिचें डोकें हलकेंच उचलून चर्माच्या घडीवर ठेवलं. नीलम्‌नें तिच्या गालावर हात फिरवून म्हटलें,

" किती नाजूक आणि सुंदर आहे नाहीं, ऋता ! हिच्या जवळ नेहमीं रहावंसं वाटतं."

यानंतर तीं दुसरीकडे कुठें निघून गेलीं. ऋतेनें त्यांना हातांत हात घालून जाताना पाहिले, अस्ताला जाणाऱ्या सूर्यानें तिच्या गालांवर मोत्याचे सर पाहिले.

दुसरे दिवशीं सकाळीं एक कडा चढून जायचा होता. ऋता आज मोठया उत्साहानें चढत होती. एकदा ती नीलम्‌चा हात धरी, एकदा देवव्रताचा धरी. एखादे वेळीं दोघाचेहि हात धरी. " अवघड वाट असली म्हणजे कोणाचा तरी आधार लागतो, नाहीं ?" ती म्हणाली.

" जपून चाला; खालीं फार भयकर दरी आहे." नीलम् म्हणाली.

ऋतेनें वांकून पाहिलें व म्हटलें, " अग बाई ग !" थोडा वेळ चालल्यानतर म्हणाली, " मला ही भयंकर दरी पाहून घेरी येत आहे. तुम्ही दोघ मिळून मला सावरा."

त्या दोघानीं एकमेकाच्या हातांत हात घातले आणि त्यावर रेलून दोघाच्या खाद्यावर हात ठेवून ती जात होती. एका अति अवघड स्थळीं तीं आलीं तोंच नीलम्‌च्या हाताला हिसका बसला. त्यासरशीं ती देवव्रताच्या वक्षःस्थळावर जाऊन पडली आणि त्यांच्या कानांवर वाणी आली, तुम्हीं उभयतांनीं सुखी व्हावं यासाठीं ऋतेचं जीवित होतं."

देवव्रत व नीलम् स्तिमित होऊन पाहू लागलीं तों त्या दरींतून वाहणाऱ्या निर्झरांत कांहीं पडल्याचा आवाज सातवार प्रतिध्वनित झाला ! पुढें त्यांचें काय झालें ही हकीकत त्या वनाइतकी, त्या रात्रीइतकी, आणि त्या कालाइतकीच अज्ञात आहे.

# आशा-बंध : : ३

" कठिणा खलु स्त्रियः " कालिदास

लता आणि ललना जवळ असेल त्याचा आश्रय करतात म्हणे. म्हणून मला आशा वाटे कीं आशावती मलाच मिळेल. मी अनुरूप आणि अनुगुणही होतों. एकत्र वाढलों होतों दोघेंही शेजारी शेजारी. तिची आई झोपाळ्यावर ओवी म्हणे:—

" शेजारीणबाई एका दारानें दोघे जाऊं
माझी मैना, तुझा राघू खेळतील. "

विंबले होते माझ्या मनावर ते शब्द. " माझी मैना " म्हणून मी माझ्या मैत्रिणीला चिडवीतही असें. ती म्हणे:—

" हें कायरे ? बघ हं मी नानांना सांगेन ! "

तिचे नाना रेल्वेमध्यें होते. आमच्या गांवाला ते स्टेशनमास्तर म्हणून कित्येक वर्षें होते. आशावती त्यावेळीं अगदीं लहान होती. आशावतीची आई शांत, सुरूप, आणि सुगरण म्हणून म्हटली जाई.

आशा लहानपणी मोठी गोड मुलगी होती. सगळे रेल्वेतले लोक तिचा लोभ करीत, रोज सकाळीं जाणाऱ्या पॅसेंजरचा पारशी ड्रायव्हर तिला 'आशा बॉय' म्हणून हाक मारल्याशिवाय आणि गोंजारल्याशिवाय जात नसे.

स्टेशनहून गाव जरा दूर होतें. आमच्या लहानपणीं स्टेशनशेजारीं त्यावेळीं आमचें एकच घर होतें. म्हणून मला रेल्वे क्वार्टर्समध्यें खेळायला जाणें भाग होतें आणि हवेंही होते. चांगली हवा आणि मुबलक पाणी यामुळें गांवापासून स्टेशनपर्यंत सबंध माळावर आज अगदीं वस्ती भरून गेली आहे. पहिल्याने वस्ती झाली, नंतर नगरपालिका आली, आणि नंतर शहर सुधारणा खातें आलें.

आशावतीला पतंगाचा भारी नाद होता. तिचा पतंग नेहमीं तुटायचा आणि आमच्या कंपाउंडांत पडायचा ! सापडलेला पतंग परत देणें, किंवा झाडावर अडकलेला पतंग चढून काढून देणें नाखुषीचा कां होईना पण साखरेचा मिळाल्याशिवाय मला कबूल नसे.

तिला पतंगाशीं खेळतांना पाहणें मला फार आवडे. आभाळांत पतंग वाऱ्यावर थरथरत गिरके घेऊं लागला म्हणजे तिला मोठा आनंद होई. तिच्या हातांत दोरी राही खरी पण तिचें सारें लक्ष वर आकाशात भिरभिरणाऱ्या पतंगाकडे असे. तिचे केस भुरभुर उडत. आकाशांत असंख्य पतंग उडत असत; त्यांतील कांहीं तुटलेले पतंग दिशाशून्य हेलकावे खात कुठें तरी पडूं पहात आणि एखादा कठोर पतंग आपल्या धारदार काचेरी मांज्यानें दुसऱ्याचे धागेदोरे तोडण्याचे खेळ करी.

अन् एखादे वेळीं एकदम दोरा तुटे; नाहीं तर पतंग थाप खाई आणि उडण्याचें नाकारी. पतंगाशीं एकतान झालेली ती बालिका जमीनीवर फरफटणारा पतंग पुनरपि वर उडविण्यासाठीं धांवपळ करी. आणि मी तिच्याकडे सारखा पहात राहीं.

तिच्या नानांना आमचे गांव फार आवडे. येथील हवा पाणी आहेच्च तसें छान ! माळावर एक टुमदार घर बांधावें, अशी मनीषा ते नेहमी

बोलून दाखवीत. माळावरील वाढत्या वस्तीचा फायदा घेऊन जमीनीच्या खरेदी विक्रींत आणि इमारतीच्या कंत्राटांत माझ्या वडिलांनीं पैसा मिळविला. या वडिलार्जीत धंद्याला अनुकूल असें मी शिक्षण घेतलें आणि मी आर्किटेक्ट झालों; चांगला नांवाजलों. आपल्या कलेचे एक प्रतीक उभारावें म्हणून मी माळावरील नव्या वस्तीच्या चौकाच्या कोपऱ्यावर आपला एक छोटासा बंगला बांधला. खरोखर किती सुंदर, आधुनिक कलायुक्त धर्तीचें, मन गुंतवून ठेवणारें तें घर होतें! ती बाग, तीं फुलझाडें, ते आकार लालित्य; ती रंग संगति!

आणि आशाही दिवसेंदिवस उपवर होत होती. दुसऱ्याचे पतंग उडतांना आपल्या गच्चीवरून आस्थेनें पाहणाऱ्या मुलाप्रमाणें मी आशेकडे बघत होतों. पूर्वींच्या सारखें हसणें खेळणें राहिलें नसलें म्हणून काय झालें; लाजणें, थरारणें, टाळणें, मुरडणें होतेंच की नाहीं? उंच पिललेल्या पतंगात पहिला चंचळपणा रहात नाही, आणि एका हिंदी कवीने म्हटलें नाहीं का?— " चलती रहेगी ढीली बाढ प्रीतके पतंग की "

आणि आशावतीच या बंगल्याची मालकीण होणार या विश्वासानें मी त्याचें नांवही 'आशाबंध' ठेवलें. पण ढीलची लढत एकंदरीनं कठीणच! त्याला धागा हाताशीं फार लागतो. दोरा सपला नाहीं तोंवर सर्व ठीक असतें पण आणीक ढील देण्यासाठीं दोरा हाताशीं राहिला नाहीं म्हणजे पतंग गोता खाल्याशिवाय रहात नाहीं आणि मग पतंग गेल्याच्या दुःखापेक्षा धागा गेल्याचें दुःख जास्त वाटूं लागतें.

एकदम पतंगानें थाप खावी तसें आशावतीनें आपलें माझ्याशीं वागण्याचें धोरण बदललें. ती न लाजता मुरडतां माझ्याशीं थट्टामस्करी करूं लागली.

होय——तो संक्रांतीचा दिवस होता. सायंकाळचें वेळीं मी आपल्या व्हरांड्यांत बसलों होतों. आकाशांत उडणारे असंख्य पतंग मला तिची आठवण करून देत होते. इतक्यांत तीच फाटकांत आली. तिनें तेथें गेटवर लावलेल्या संगमरवरी फलकाकडे पाहिलें; स्मित केलें; वरतीं मजकडे पाहिलें, घरांत जाऊन हळदीकुंकू घेतलें आणि माडीवर येऊन म्हटलें:— " काहो राव? साखरतीळ कुठे आहेत?"

तिच्या भालावर अनेकवार लावले गेलेले लाल कुंकू तिच्या नाकावर सांडलें होतें; काळ्या डोळयांना लावलेलें काजळ तिच्या गोऱ्या गालांना लागलें होतें; तिच्या गळ्यांतील पिवळा धमक चपलाहार तिच्या निळ्या गडद जरतारी पदरावरून रुळत होता.

" साखर नि तीळ दोन्ही तुझ्या जवळच मला दिसत आहेत "

" मुळीच नाहीं. दाखवा बरं ! "

" गालावर तीळ आहे नि ओठांत साखर "

" चला कांही तरीच ! " ती फणकाऱ्यानें जाऊं लागली तेव्हां मी तिला म्हटलें:— " का ? राग आला वाटतं ? "

" नाही तर काय होईल ? अन् कायहो गोड बोले; आपल्या बंगलीला आपण नांव काय दिलंय् ? "

" आशा-बंध, तूं वाचलंस तर खरं मघाशीं. "

" कोण ही आशा ? "

" या बंगलीची मालकीण. "

" कुणी सांगितलं ? "

" सांगायला कशाला हवं ? "

" हा पतंग आशेवर भिरभिरतोय तर ! "

" होऽ—चलती रहेगी ढीली बाढ प्रीतके पतंग की. "

" फोल आहे आशा. "

" कां ? "

" पतंग दुसऱ्यानें लुटला देखील ! "

" आशावती !– "

पतंगाचे नादात तिसऱ्या मजल्यावरुन खालीं कोसळावें तसें मला झालें. पहिल्या मुहूर्तावर ती उजवली जाणार असें तिच्याचकडून मला कळले. माझ्या भावनेची प्रखरता तिला जाणवली नव्हती—कळली नव्हती असें नाहीं पण—

आशेला सगळेच गुंतलेले आहेत. जास्त श्रीमंतींत जास्त सुख या आशेनें ती तिकडे गेली; रूपाच्या, नाजुकपणाच्या आशेला जो गुंतला—मी आपलें सगळें मन—सगळा जीव आशेवर—तिच्यासाठीं बांधलेल्या

'आशा बंधावर' गुंतविला होता. निराशेने मला जबर धक्का दिला आणि—माझ्या उशाशीं ती बसून राहिली.

" तुम्ही आपल्या जिवाला लावून घेतलय् "

" अजून तूं आपला निर्णय बदल. " मी उत्तर दिलें.

" तुम्हीच जरा धीर धरा, सांवरा, नवी आशा करा म्हणजे झालें. आशेचे धागे असंख्य असतात; किती जरी तुटले तरी एखादा तरी शिल्लक राहतोच. "

" आणि तो शेवटचा धागा तुटणं म्हणजेच अंत ! " मी आत्यंतिक उद्वेगानें म्हटलें.

" आपल्याला हवा तेव्हां पतंग उडतोच असें नाहीं. "

" पण माझा पतंग थाप खाऊन,— सबंध गोता खाऊन, जमिनीवर खरचटून फाटून ही गेला ! " निराशेनें बधिर झालों होतों मी !

शून्य दृष्टीनें तिने आकाशाकडे पाहिलें. उंच पिललेला पतंग जशी ओढ घेतो तसें माझें मन अजूनही तिजकडे ओढ घेत होतें. मी म्हटलें:— " आकाशांत उडणारे दोन पतंग एकमेकांच्या कन्या तोडण्यासाठीं जसे अगदी जवळजवळ यावेत तसें आपलें झालें. मला आपलें वाटलें होतें कीं प्रीतीची तार लावून मी तुला ओढून लपेटून घेईन—आपली करीन."

ती आपल्या सासरीं गेली आणि मी तसाच राहिलों. तुटलेला पतंग उंच झाडावर अडकून उडत राहतो तसा मी जगत राहिलों. माझ्या मनाचा धागा तिच्या ठिकाणीं अजूनही गुंतून राहिला होता. नवी आशा उपजली होती. लयला प्रमाणें ती आपल्या ममतेंत पडेल का ?

उंच गेलेला पतंग गोता खाऊं लागला म्हणजे मोठें कठीण असते, उडवणाऱ्याची तर त्रेधा उडतेच पण नुकसानही आतोनात होतें. आशेचेंही असेंच झालें. आशा आपल्या सासरीं गेल्यानंतर दोन महिन्यातच नानाची बदली मद्रासकडे झाली, तेथली हवा त्याना मानवली नाहीं. आशेच्या आईने इहलोक सोडला आणि नाना नौकरी सोडून परत गावीं येऊन राहिले म्हणून वाचले. पण त्याची प्रकृती पुन्हा सुधारली नाहीं. वर्षभरानें आशा आपल्या आशेचा चक्काचुर होऊन परत आली. मुलीच्या दुःखामुळें नानाच्या दुखण्यानें उलट खाल्ली, आणि त्यांना आबेगांवला

आरोग्य मंदिरांत रहावें लागलें. दोन वर्षें त्यांची तशीं गेलीं आणि त्यांना वाटत होतें आपण बरे होऊं पण--

आशेला अंत नाहीं हेंच खरें! नानाचे नंतर आशावतीला कुणी राहिलें नाहीं. मी तिला आणण्यासाठीं आंबेगावला गेलों, ती आपल्या दुःखांत चूर होती, ती काही बोलली नाही. आपण होऊन आलीच नाहीं—मी आणली तिला! वाटेंत तिनें विचारलेल्या प्रश्नाला एकाक्षरी उत्तरें दिलीं. आमचें गांव गाडीचें शेवटचें स्टेशन होतें. सर्व उतारू उतरून गेले पण आशा तशीच बसून होती—खिडकींतून बाहेर पहात!

"आशाताई, उतरायचं नाही का?" मी तिच्याजवळ जाऊन म्हटलें.

"काय करायचय् उतरून?"

क्षणभर काय करावें—मला सुचेना.

"मग काय गाडींतच राहणार?"

"तुम्ही जा घरीं. माझ्या नादीं लागूं नका. माझे सगळे बंध तुटले आहेत!"

"पण 'आशाबंध' शिल्लक आहे ना." मी साहसानें म्हटलें. तिच्या दुःखाची, वैतागाची परिसीमा झालेली होती. अशा वेळीं लालसेची भाषा मी बोलायला नको होती.

"आशा—बंध!" तिनें डोळे मिटून एक दीर्घ निश्वास टाकला आणि ती मजबरोबर आली.

पण तिनें आशाबंधांत पाऊल टाकलें नाहीं नुसतें पाहूनच तिला भडभडून आलें. पुढें कधींही त्या बंगल्यात ती आली नाहीं. भगिनीसमाजात राहिली आंणि करमेना म्हणून मुलींच्या शाळेंत शिक्षकिणीचें काम करू लागली.

दिवसामागून दिवस गेले. पुन्हां लढत घ्यायला तिचें मन तयार होईना. आणि पतंगानें गिरकी खाल्ली असतां ऐनवेळीं हाताखालचा दोरा तुटावा आणि हातचा जाणारा पतंग सावरतां सावरतां पुरेपुरे व्हावें तसें मला झालें.

आशावतीला वाईट वाटेल म्हणून एक महत्त्वाची गोष्ट मी तिच्यापासून कित्येक दिवस लपविली. वस्तीमागून सावकाश येणाऱ्या शहर-सुधारणा खात्यानें माझा 'आशा—बंध' तोडून त्या ठिकाणी चौक करायचें

ठरवलें होतें. मी भगीरथ प्रयत्न केले पण खात्याने आपला निर्णय बदलला नाहीं. मला उदार भरपाई नको होती.

माझ्या आशाबंधाचे नुकसान भरपाईपलीकडचें होतें !

वर्षभरानें 'आशा-बंध' भंग पावलेला आम्ही आपल्या डोळयांनीं पाहिला. अतीशय वाईट वाटलें मला—पण तिच्या खळखळ वाहणाऱ्या अश्रु-धारांनीं कित्येक दिवस तिच्या लाल ओठांना संततधार अभिषेक केला.

पण या घटनेनें माझ्या गोते खाणाऱ्या पतंगाला दोरा पुरवून स्थिर केलें असेल कदाचित्. भावनावशेचें हृदय एखाद्या दोऱ्यानें कांठोकांठ भरलेल्या चरकासारखें असते. वेळीं पतंग दिसेनासा होईल पण दोरा सरणार नाहीं ! आणि " चलती रहेगी ढीली बाढ प्रीत के पतंग की. "

आशेचे धागे तुटतात, प्रीतीचे नाहीं.

—माणसानें आशा करूं नये, प्रीती करावी हवी तर !

# लोकनिंदितेचा व्रतभंग : : ४

डोईचा पदर आला खांद्यावरी ।
भरल्या बाजारीं जाईन मी ।—॥ —जनी

[ हें कुणीही वाचूं नये. वाचलें तरी आपले मनोमन ठेवावें; षट्कर्णी करूं नये. कारण हे मनांतल्या अगदीं आंतल्या गाभ्यांतलें, राहवलें नाहीं म्हणून कुणाला तरी सांगितलें. ज्याना सांगायचे होते त्याना अनेकवार भेटून ही समक्ष सांगायचें साहस झालें नाहीं म्हणून कागदावर आलें, अक्षरांत आलें आणि त्यांच्या उशाशीं ठेवलेलें त्यांनीं वाचलें असें कळल्यानंतर त्यांची भेट होईल तेव्हां मन बुजल्या गोंधळल्याशिवाय राहील असेंही नाहीं.

" काळी चंद्रकळा नको नेसूं अंगणांत

–तुला चांदण्या हांसत.–"ही बालपणीं आईनें गाईलेली ओवी किती सखोल अर्थ सूचित करते हें अशा वेळीं पटतें. किंचित्‌ही सरकलेला पदर सांवरल्याशिवाय कुणी सुभगा रहात नाहीं. मग हें तर अगदीं उघडें केलेलें हृदय ! ]

–आणि काळया चंद्रकळेच्या त्या ओवीची आठवण मला त्या रात्रींही झाली. दोन वर्षांपूर्वी वर्षारंभाच्या रात्रीं अमेरिकन मैत्रिणीच्या आग्रहास्तव मी नव्या जुन्या वर्षाच्या संगमाच्या नृत्यसमारंभाला गेलें. काळी मलमलीची जरी किनारी साडी नेसून गेले. किती आवडली सर्वांना ! किती स्तुती केली सर्वांनीं ! तिची आणि माझी देखील. माझ्या रूपाची अन्–

मी नृत्य केलें नाहीं. कारण मला बाजूला बसून गंमत पाहणेंच आवडलें. माझी मैत्रीण मला म्हणाली:––

"कां ग, तुला गोड वाटत नाहीं कां ?"

मध्यरात्र जवळ आली तसे मद्याचे चषक रिकामे होऊं लागले. नृत्य करणारीं युगुलें रंगात दंग झालीं; संघवादितें जास्त द्रुत मधुर वाजूं लागलीं. बाराचे ठोके पडले आणि चुंबनें दिलीं घेतलीं गेलीं. मी बाहेर पाहिलें. चादण्या खरंच आम्हाला हसत होत्या.

पुन: मैफिल झडली. पुनः संगीत सुरू झालें. पुन: "सुखी नवें वर्ष" ओठांओठांतून प्यालें गेलें. खिडकींतून येणाऱ्या गार वाऱ्यानें मला गुंगी येत होती. इतरांना उत्तेजित करणारा लाल माधुरीचा एक थेंबही मी घेतला नव्हता. माझी मैत्रीण आज अगदीं खुषींत होती. काहीं वेळानें तीही दमून मजजवळ येऊन बसली. रंगीत झगे आणि संगीत आलाप आमच्या भोंवतीं दंगल करीत होते.

किती वेळ गेला कळलेंच नाहीं. मध्यरात्रीचें हें असेंच आहे. नियमित ठोके देऊन वेळ सागणारें घडयाळही मध्यरात्रीनंतर तीन एकेकच ठोके देतें. काय समजावें माणसानें ?–हा हां म्हणतां दोन वाजलें.

आणि याच जागरणाची निशा माझ्या डोळयावर स्वस्तिक साडी स्टोअरमध्यें दुसरे दिवशीं आपली पहिली ओळख झाली तेव्हां होती. मी गंधी रंगाचें एक जॉर्जेटचे पातळ विकत घेतलें त्यावेळीं मजबरोबर एक माजी नट होते. स्त्रियाच्या संगीताच्या शिकवण्या ते करीत. त्या नटानें

मजबरोबर असणें तुम्हाला तितकेंसें रुचलें नसेल. मी दुकानांत आंतल्या बाजूला गेले तेव्हां तुम्ही सहज म्हणून दुकानदाराला विचारलें:--

"कोण हो ही?"

"तुम्ही ओळखीत नाहीं?" ते हसून म्हणाले.

"नाहीं."

"मग ओळख हवी का?" तेंच मिस्किल हास्य.

"कां नको?"

"या मिसेस् दमयंती देव. पूर्वीच्या सुधा सबनीस."

काहीं वेळानें मी बाहेर आले आणि दुकानदार आपली ओळख करून देऊं लागले तेव्हां मी म्हटलें:--"आमचे गायन मास्तर तुमचें किती किती वर्णन करतात सारखे!--नुसतं नाव ऐकून होतें; किती छान झालं ओळख झाली!"

खरंच--छान झालं? कांहीं दिवसांनीं पुन: मी तुम्हाला सिनेमा थिएटरांत पाहिलें. आणि हांक मारली मी आणि डॉक्टर अर्ध विरामांत शीतपेयें घेत होतों. मी आपल्या हातांतील रासबेरीचा ग्लास तुम्हाला दिला; परस्पर ओळख करून दिली आणि म्हटलें:--"किती किती गोड लिहितात हे--अगदीं या गोड पेया सारखे. अन् आम्ही किती आवडीनें तुमचें लिखाण वाचतों याची तुम्हाला कल्पना नसेल बरं कां?"

कशी असेल? तो ग्लासही पण माझा उष्टा होता बरं कां? तुम्हाला कल्पना असती तर कदाचित् तुम्ही प्यालाही नसतां; कदाचित् जास्त आवडीनें प्यालाही असतां! मला आठवून आठवून गंमत वाटते; काय केलं असतंत बरं?

आणखी कांहीं दिवसांनीं टिळक चौकांत आपली भेट झाली. एका कॉलेज तरुणाच्या फटफटीच्या मागें बसून मी जात होतें. तुम्हाला पहातांच मोटर सायकल थांबायला लावून मी उडी टाकली तुम्हाला एका बाजूला नेलें आणि म्हटलें:--"कधीं तरी एखादे दिवशीं चहाला याना. कधींही. तुम्ही दिवस सांगा म्हणजे झालं. मी डॉक्टरनां सवड काढून रहायला सांगेन. रविवारीं सकाळीं जमेल कां? ठरल हं नक्की--बरं का? थँक्यु--बाय बाय्!"

अशा रीतीनें आपण एकमेकांच्या जीवनांत प्रवेश केला हळूहळू. आपला सहवास वाढला, जाणें येणेंही वाढले, मनें मोकळीं झाली. हितगुजें गुपितें पत्रोत्तरेंही झाली. विश्वास आणि आवड उत्पन्न झाली–पण त्या दिवशीं मी तुम्हाला फसवून आपलें उष्टें पेय पाजलें. याबद्दल मला राहून राहून वाटले. एक प्रकारें मी तुमचा व्रतभंगच केला म्हणाना! मी तसें का केलें? उगीच लहर लागली म्हणून?–नाहीं.

अशा रीतीनें दुसऱ्याला फसवून भ्रष्ट करणारे माणूस तसेच निरंकुश असले पाहिजे नाहीं? अन् स्वैर नि उत्श्रृंखल; अन् असेच कांहीं कांहीं पण या अलौकिक लोक निंदितेला कुणी काय म्हणायचें ठेवलें आहे?

मला आपले वाटे जनरीतच आहे अशी! लोक कुणाला निंदित नाहींत? के. ई. एम्. मध्यें मी नर्स होते. सुधा सवनीस होते तेव्हांपासूनच हा ससेमिरा माझ्या मागे आहे. मला कळत नाहीं मी कधी काय अशी वावगी वागले? मी कुणाशीहि अगदीं सलगीनें वागते, लाघवीपणानें बोलते, सनातनी स्त्रीप्रमाणें परपुरुषस्पर्शाचा विटाळ मानीत नाहीं. जेथें जाते तेथें आपल्या सौजन्यानें, आपलेपणानें, प्रसन्नतेनें—होऽ– आणि लोक म्हणतात सौंदर्याने–सुखद वातावरण उत्पन्न करिते हीच तर माझी चूकभूल होत नाहींना? माझ्या प्रेमळ मोकळ्या चाकळ्या वागण्याचा भलताच अर्थ करून फसून पुष्कळसे तरूण पागल बनतात आणि फजीत होतात हा काय माझा अपराध? कुणाही कुलीनेप्रमाणेंच आजवर मी वागलें आणि पुढेंही वागेन. पहिल्या परिचयानतर जातीय दंग्यांत तुम्हांला अपघात झाला तेव्हा आपल्या घरीं आणून आस्थेनें मी तुमची शुश्रूषा केली. तुम्ही म्हटलें:—"अकारण अततायी झालेल्या त्या लकाकणाऱ्या शस्त्राइतकेंच माझ्या केसावरून फिरणाऱ्या हाताचे अकारण मार्दव अनपेक्षित आहे." आणि मी हसून उत्तर दिलेः—"कदाचित आभासही असेल!"

त्या दिवशीं तुम्ही कसे म्हणालात कीं माझें दमयंती नांव ठेवलें गेलें तें कांहीं तरी संकेतानें असावें. असेलही. पौराणिक दमयंती जशी पतिमरणानंतर पुन्हा स्वयंवर करायला तयार झाली तशी मीही झालें असंच ना? पण ते नाव मी स्वतः डॉक्टरांशी रजिस्टर विवाह झाल्यानंतर मी आपल्या

आवडीनें घेतलें आहे. उगीच गंमत म्हणून मी आपले गोड नांव सोडलें नाहीं. सहेतुक होतें तें !

तुमची ही सुधा सबनिस लहानपणीं अगदीं सनातनी संस्कारानें संस्कृत झालेली आहे. कळायला लागण्याच्या आधींपासून आईनें मला हरतालिकेचा उपास घातला. चांगला नवरा मिळावा आणि जन्मोजन्मीं तोच नवरा मिळावा म्हणून कळूं लागताच मी त्या देवीची आराधना केली. प्रवेश परीक्षेपर्यंत शिक्षण मिळालें. पण मनोमन भावनेची घडण त्याच खडतर असिधाराव्रतानें ! पहायला येणाऱ्या प्रत्येक अनुरूप तरुणाला पाहून वाटावें " हाच असेल का आपला साता जन्मींचा संकल्पित अनन्य साधारण सतिव्रताचा देव ? "

जेव्हां तो देव प्रगटला तेव्हां समाजाप्रमाणें निसर्गानेंही गरज उत्पन्न केली होती. निसर्गानेंच त्याची भक्ति रक्ताच्या गोलकागोलकांत नेऊन भिनविली होती. वटसावित्री, मंगलागौरी इत्यादि देवताच्या आराधनेची फलश्रुती त्याच देवाचा चिरलाभ सांगते म्हणूनच तरुणी इतक्या निष्टेनें त्या सर्व उपासना करते.

पिंवळी अष्टपुत्री आणि उलटी काचोळी घालून मी एक दीक्षा घेतली. व्रत घेतलें; सस्कृत झाले. विवाहाच्या दिवशीं केस मोकळे सोडून जन्मभर नव्हे जन्मोजन्म टिकणाऱ्या एका प्रतिज्ञेचें उदक सोडलें. असेंच माझ्या अंतःकरणांत बिंबले, खोदलें गेलें.

पतीनें माझ्या मनावर कधींच परिणाम केला नाहीं; व्रतानें तें भरून भरून गेलें होतें. पती कोणीही असो. ते व्रताचें एक उपांग आहे. सतीच्या भावनेची एकात्मता हेंच तिच्या व्रताचें प्रधान—असें मला आपलें वाटें.

नाहींतरी सती आणि संन्यासी यांच्या व्रतामध्यें काय अंतर आहे ? सर्व ऐहिक सुखांचा सापेक्ष आणि निरपेक्ष त्याग इतकेंच !

पांच महिने मी सुहासिनी राहिले. आणि माझे दैवत दिवंगत झालें. सावित्रीप्रमाणें मला मरणावर मात करता आली नाहीं किंवा सामान्य सती प्रमाणें मरणाशीं सख्यही करतां आलें नाहीं. नेहमीप्रमाणें मी जगलें—जिवंत राहिले, आणि माझ्याबरोबर माझे व्रतही जीव धरून राहिले. पतिव्रतेच्या

गौरवाला कारण होणारे तिचे व्रत. पतीच्या अस्तित्वाची देखील गरज आणि तमा ठेवीत नाहीं तें असें !

कांहीं दिवसांनी करमेना म्हणून मी कॉलेजांत जाऊं लागले, माहेरचें नांव लावलें, संस्कृत शिकूं लागले. ऋग्वेदातील एका ऋचेनें माझ्या मनाला धक्का दिलाः—

" निर्जीवाच्या जवळ बसलेल्या स्त्रिये, ऊठ, आणि जीवनाकडे ये. प्रेमानें हात धरणाऱ्या पतीचें तुझें हें जायात्व येथवरच जाण. "

जीवनाकडे ये ! आपलें स्वतःचें जीवन जग ! असलें अमोल जीवित फुकट घालवूं नको !

वर्षभर मी कॉलेजांत होतें पण कशी वागलें हें सांगितलें तर कुणाला खरेंही वाटणार नाहीं. कॉलेजांत मी कुणाकडे डोळा उचलून पाहिलें नाहीं, कुणाशीं बोललें नाहीं, कुणाला शिवलें नाहीं कीं कांहीं नाहीं—कीं कांहीं नाहीं !

पण हें काय जीवन झालें ? मी बोललें, चाललें, हंसलें, खेळलें तरीही व्रतीच नाहीं कां ? प्रेमानें हात धरणाऱ्या पतीचा ऋणानुबंध खरंच जन्म-जन्मांतरीचा आहे का ? आयुष्याच्या ऐन उमेदींत प्रत्येक कुमारिकेला ही खडतर दीक्षा दिली जाते.— " जीवनाकडे ये " असें नसांनसांतून वाहणारी ऊर्मी हाकारित असतानां तिच्या हातीं त्यागव्रताचें कंकण बांधलें जातें.

शिक्षकाचा व्यवसाय करून माझे वडील माझं पालन व लालनही करीत. ते अचानक गेले आणि मला बी. पी. एन्. ए च्या वर्गात शिकून के. ई. एम्. मध्यें नर्स व्हावें लागलें. माझें छायाछत्रही गेलें आणि माया बंधही तुटले. हॉस्पिटलमध्यें मला दुःखाकडे दूर उभी राहून पाहता आलें. मरणाकडे ओढला जाणारा प्रत्येक इसम जीवनाकडे धाव घेई. " जगावें, मनसोक्त जगावें. सुखी व्हावें आणि सुखवावें " असा आदेश मला रुग्णालयानें दिला; माझ्या राहणींत बदल होऊं लागला; समाजाशीं संबंध जास्त येऊं लागला; बरे वाईट अनुभव येऊं लागले आणि लोक निंदूं लागले.—विनाकारण निंदूं लागले.

पहिल्यानें मी जरा भ्यालें, बावरले, पण माझ्या असहाय स्थितीनेंच मला धीर दिला. लोक निंदेनेंच मला स्वतःच्या आवडीचें जीवन बेछूटपणें जगण्याला चेतावणी दिली.

याच वेळीं माझा व डॉक्टरांचा परिचय झाला. डॉक्टर त्यावेळीं मेडिकल कॉलेजांत फिजिऑलजीचे प्रोफेसर होते. आपल्या कामांत वाकब होते; आपल्या सामाजिक वागणुकींत अगदीं बिनचूक होते. सीधे, समंजस आणि संयमी होते. मला ते नेहमीं म्हणत:— "सिस्टर, आपले स्वतःचे आवडीचें जीवन जगणारे कुणीही असुखी होत नाहीं ! "

अजूनही ते मला सिस्टरच म्हणतात आणि मी त्याना डॉक्टर म्हणते. मी त्यांना हंसून म्हणे. " डॉक्टर, हा तुमचा विषय नव्हे. आपल्या हाताला दुसऱ्याचा हात लागला तर त्याचे रक्तवाहिनींवर होणारे परिणाम बिनचूक वर्णन कराल; पण त्याच स्पर्शाच्या मनाला होणाऱ्या संवेदनांकडे कधींही लक्ष देणार नाहीं."

हळूहळू मला उमगून आलें कीं लोकांत माझ्याबद्दल जो गवगवा आहे त्याचा उगम गांवातील कांही श्रीमंत, वजनदार आणि विद्वान लोकांच्या बैठकींत आहे. उद्देश-मला बदनाम करावी, समजांतून उठवावें, आणि मग—

माझी गाळण उडाली, मी डॉक्टराना विश्वासात घेतलें, सर्व हकीगत सांगितली आणि म्हटले,—" अशीच माझी शिकार होणार कां हो ? "

त्यानीं मला धीर दिला, पण माझा धीर सुटला. कुणाचां तरी आश्रय करावा तर आपल्या आवडीप्रमाणें वागणें साधणें शक्य नाहीं.—मग मी जीवनाकडे परत आले तरी कशाला ? मला आपलें स्वतःचें जीवन जगायचें होतें. आणि आहे ही !

दिवसांमागून दिवस गेले. डॉक्टर मला म्हणूं लागले:—" सिस्टर. तुला मनाप्रमाणें वागायचें आहे ना ? मग माझी हो. मी तुला तुझे स्वातंत्र्य देण्याचें वचन देतों. माझा तुझ्यावर विश्वास आहे; प्रेम आहे. जीवनाकडे परत ये. "

मच्छींद्राना परकाया प्रवेशांत पडला होता तसा विसर मला माझ्या दीक्षेचा पडला. कुणीही मला जागें केलें नाहीं; सावध केलें नाहीं.

मी देवाला पुन: आवाहन दिलें. हनिमूनच्या दिवशी डॉक्टर मला म्हणाले:—" सिस्टर, खरोखरीच आज तूं जीवनाकडे परत आलीस. असं समज !"

त्यांनीं आपलें वचन अक्षरश: पाळलें. माझ्यासाठीं त्यांनीं सुखाची पगारी नोकरी सोडून या गावांत प्रॅक्टिस सुरू केली. आणि सुधा सबनिसचा लौकिक ' दमयंतीला ' कांही करणार नाही अशी मला आशा होती.

पण ती माझी आशाच ठरली. दमयन्ती वाईट चालीची आहे असे गांवातील संभावित अकारण म्हणूं लागले. मला वाटलें आपण आपली चाल बदलावी. कुठें जाऊं येऊं नये; कुणाला दिसूंही नये:—गोषा करावा अगदीं ! पण डॉक्टर म्हणत:—

" त्याला जीवन म्हणत नाहीत; जीवनाचें थडगें झालें तें !"

असेच दिवस गेले. गावातील सभ्य, संभावित, श्रीमंत माझ्याभोंवतीं घिरट्या घालूं लागले. पण मला कल्पना नव्हती या थराला गोष्टी येतील. त्या रात्रीच्या प्रसंगानें शेवटीं कहर केला; मला जिणें नकोसें केलें. नाहीं तरी मला येथ तुमच्याशिवाय आपलें असें कोण आहे ? देवटाक्याच्या पाण्यासारखे स्वच्छ मन मला कुठेंच आढळलें नाहीं. तें तुमच्या ठिकाणीं मी पाहिलें.

त्या दिवशीं मध्यरात्रीपर्यंत मी तुमच्याकडे बोलत बसले होते. मला घरापर्यंत पोंचविण्यासाठीं तुम्ही जिना उतरून आलाही. पण खालीं फूटपाथवर दाजी मोरो भेटले. त्यांनीं आम्हाला पाहून म्हटले:—ऑ ऽ ! अन् इतक्या अपरात्रीं ?—कुणीकडे ?"

मला घरापर्यंत सोबत करायला तुम्ही येत आहां असें मी सांगितलें तेव्हां ते म्हणाले:—

" त्याना कशाला तसदी देतां ? मी आहेच तुमच्या घरापर्यंत सोबत."

" अं:—त्याला काय होतं." असे म्हणून तुम्ही चालूं लागला पण मीच म्हटलें:—" खरंच; कशाला तुम्ही उगीच जा ये करता रात्रीची ? मी जाईन यांच्या सोबतीनें "

या दलालाबरोबर मी जाऊं नये असे तुम्हाला वाटले होय ना ? आणि तें ठीकच होतें असें त्याने लौकरच आपल्या वर्तनानें दाखविलें. आम्ही

चौकांत येतांच आम्हाला बाबूराव सावकार आणि उद्धवराव पित्रे एका मोटारी शेजारीं दिसले. त्यानी मला म्हटलें " या ना; गाडी आपलीच आहे."

" नको नको थँक्स." असें म्हणून मी पुढें चालू लागले. त्यांनीं धावत येऊन माझा रस्ता अडविला. " हे पहा; मिसेस देव प्लीज, प्लीज मुकाट्यानें गाडींत बसा." दारूची वस्कन् घाण आली त्याच्या बोलण्याला. मी त्यांचा नूर ओळखला आणि निकरानें म्हटले " नाहीं, मी येत नाहीं; माझी वाट सोडा." मी मागें वळून पाहिलें. दाजी मोरो मागेंच होता तो म्हणालाः—" अहो बाई, कराना त्यांच्या मनासारखें. त्याला काय होतें ? नाहीं तरी रात्रीच्या तुम्ही मुलुख गिरीवरच निघालात ना ?" त्यानें आपलें खलरूप दाखविलें. मेला त्याच्या कटात सामिल होता. संतापानें मला भान राहिलें नाही—इतक्यात त्या नराधमांनीं माझे हात धरले. होतें नव्हतें तेवढें अवसान एकवटून मी ओरडलें. मला वाटलेंच होतें तुम्हाला ऐकू येईल आणि तुम्ही धांवत याल आणि तसें आलाही. पण त्यापूर्वीच एकदम अचानक भय्यासाहेब गोखले आपल्या आठ दहा स्वयंसेवकासह कुठून आले देवाला माहीत, त्यानीं त्या दोघाना पकडले. दाजी मोरो मागल्या पावलीं पसार झाला.

भय्यासाहेबांनी माणसें पाठवून चौकीवर वर्दी दिली. पोलिस आणि तुम्ही एकदमच. आलां त्यांनी त्या दोघा वजनदार पुढाऱ्याना ताब्यांत घेतलें आणि तुम्ही मला घरीं पोचविलें.

इन्स्पेक्टर केसकर, डॉक्टराचे चांगले स्नेही शाळेंतले बरोबरीचे बाल-मित्र आहेत हें सुदैवच म्हणायचें ! दुसरे दिवशीं सकाळीं त्यानींच दार ठोठावून आम्हाला जागें केलें. चहापानाबरोबर आमचें संभाषण झालें. रात्रीच्या प्रकरणात त्यानीं माझे स्टेटमेंट लिहून घेतलें. हा विड्यांचा कार-खानदार बाबूराव सावकार लक्षाधीश आहे, म्युनिसिपालिटींत आहे. अनेक संस्थाचा अध्यक्ष आहे. आणि ऑनररी मॅजिस्ट्रेट होऊं पहात आहे. आणि त्याचा दोस्त उद्धवराव पित्रेही एक नंबरचा डामरट गुंड आहे. विद्वत्ता कुणाला माहीत खरी खोटी—पण देशभक्ती तर निव्वळ लबाडी आहे. जुगारीवर तो जगतो म्हणे.

" पैसा आणि प्रतिष्ठा यांच्या जोरावर या लोकांनीं काय वाटेल ती अनन्वित कृत्यें या गावांत केलेलीं आहेत. ती महिला मंदिरांतील मुलीची हकीकत ठाऊक आहेच तुम्हांला–अशा असंख्य आहेत हकीगती! संभावित गुन्हेगारांची टोळीच आहे ती!"

" उद्धव पित्रेला फसवणुकीच्या आरोपावरून शिक्षा झालेली आहे म्हणे."

" काल रात्रीं दारू पिऊन तर्र होते बेटे! माझ्या मनांत त्यांच्यावर दारू पिऊन मोटार चालविल्याबद्दल खटला भरायचा होता. कारण गाडीला ड्रायव्हर नव्हता. पण त्यानीं जमादाराला चंदी चारली अन् शिवाय मोटार होती रावसाहेब सावनूरांची!"

" सावनूरासारखे वजनदार पेन्शनर सरकारी अधिकारी या कटाला सामील?"

" आणि म्हणूनच हें प्रकरण जास्त नाजूक झालें. तुम्ही काल रात्रीं सावनूरांकडे गेला होता की?" इन्स्पेक्टर केसकरांनीं मला विचारलें.

" मी जन्मांत कधीं त्यांच्या घरीं गेलें नाहीं."

" मग काल इतक्या अपरात्रीपर्यंत तुम्ही कुठें होता?"

मी तुमच्याकडे असल्याचें सागितलें.

" तुम्ही म्हणतां मी दाजी मोरोबरोबर घराकडे परत येत होते आणि दाजी मोरो म्हणतो मी रात्रीं मुळीं घराच्या बाहेरच पडलों नाहीं."

" आहे कीं नाहीं दलाल!"

" भय्यासाहेब गोखले आणि त्यांच्या बरोबरीचे सिविक गार्ड म्हणतात कीं बाईची किंकाळी ऐकून आपण धावत आलों. त्यावेळीं दोघे आरोपी जबरीनें बाईना धरून मोटारींत घालित होते आणि बाई धडपडत होत्या. आणि आरोपी म्हणतात —"

केसकरांनीं डॉक्टरांना बाजूला नेलें. त्यांची काय भाषा झाली ती डॉक्टरांनीं नंतर मला सांगितली. आमच्यांत परस्परापासून गुपित असें कांहीं नाहीं. इन्स्पेक्टर केसकरांनीं सागितलें:—" हे दोन सभ्य गृहस्थ म्हणतात कीं रात्रभर बाई आपल्या बरोबर मजा करीत फिरत होती ती आपण होऊन

रावसाहेब सावनूर यांच्याकडे आली आणि त्यांनीं आपली मोटर आम्हांला दिली. आम्ही तिला लकीमध्यें चलण्याचा आग्रह करीत होतो आणि ती नको म्हणत होती. ही आमची अगदीं खासगी बाब होती. पण भय्यासाहेब मध्यें आले. भय्यासाहेबानीं आपल्याला पाहिलें आणि ओळखलें असें पाहून स्वत:ची अब्रू वांचविण्यासाठीं बाई ओरडली."

आहेत की नाहींत उलटी काळजे! आणि रावसाहेब सावनूर मी रात्रीं त्यांच्या घरीं गेल्याचें शपथेवर सांगतात!

"हे सारे लोक बदमाष आहेत हें मला माहीत आहे." इन्स्पेक्टर केसकर पुढें म्हणाले "आणि लोकांत तुमच्या चारित्र्याबद्दल जो गवगवा आहे तो याच लोकांनीं पसरवला असला पाहिजे अशी माझी खात्री झाली आहे पुराव्यानिशीं."

"कारण?"

"अशारीतीनें तुम्ही संसारांतून उठाल आणि त्यांना हवी ती संधी मिळेल."

केसकरांनीं आणखीही एक ऑफिशीअल सीक्रेट सांगितलें. दमयंती देव हिच्याबद्दल पोलिस रेकॉर्ड चागला नाहीं. त्यामध्यें तिच्याबरोबर तुमचेंही नांव येते. ती रात्रीं अपरात्रीं तुमच्याकडे येते. वेळीं अवेळीं तुमच्या बरोबर फिरते. आपल्या पतीला ती जरी धुतल्या तादुळासारखी वाटत असली तरी जनापवाद तिला चांगलें म्हणत नाहीं.

महाजनाची ही रीतच आहे. मला मोठी गम्मत वाटते आणि भयही वाटतें; जी डोकीवरून पदर घेईल तिचा पदर ओढावा आणि जी घेणार नाहीं तिला बाजारातून जाऊं देऊ नये!

अन् ही बातमी गांवात ज्याच्या त्याच्या तोंडीं आहे. लोक तुमच्या माझ्याबद्दल; डॉक्टरांच्या आणि त्या नीच्याच्या बद्दल काय वाटेल तें बोलत आहेत. विनयभंगाचा खटला माझ्या बदनामीच्या भयानें डॉक्टरांनीं केसकराना पुढें चालवूं दिला नाहीं. कुणी कुणी म्हणतात ही चूक झाली.

जगण्याचा आनंद मिळविण्यासाठीं जीवनाकडे परत येताना त्यांतील दु:खांकडे मी पाहिलें नाहीं. सतीच्या व्रताचें एक साधन नाहींसे झालें तर त्या जागीं दुसरे साधन बसवून; एक देव भंगला तर त्याजागीं दुसरा

देव मांडून हेंच व्रत पुढें चालविण्याचा मी अट्टहास केला! असे देव भंगत गेले तर त्याऐवजीं नवे नवे देव मांडले म्हणजे झाले! इहलोकीच्या दैवताला अमर करता येईल; हो ना?

पण मला आपलें राहून राहून वाटतें माझा अशा व्रतभंग झाला नसता तर बरें झालें असतें.—आपल्या गळयातला मुहूर्तमणी हरवावा आणि नतर त्याची किंमत गणिताच्या पलीकडे आहे असें कळावें तसें झालें. सारखी हळहळ आणि हुरहुर वाटून राहिली आहे. अन् ती नेहमींचीच राहील. व्रताचा त्याग करून जीविताकडे मुरडलेल्याचे कुंकू, काकणें, गळेसर नुसते शोभेसाठीं—त्यांत मंगल असे कांहीं नाहीं.

आज गृहिणी म्हणून कोणता ऑनर—सामाजिक संकेत—बंधन मी पाळीत नाहीं? मी डॉक्टरांवर प्रेम करिते; त्यांचा माझ्यावर सर्वस्वी विश्वास आहे.

पण एकदां भंगलेलं व्रत पुन्हा साधत नाहीं हेंच खरं. पहिल्या सौभाग्यानें सुहासिनी झालेल्या स्त्रीलाच जग गौरविते तें उगीच नाहीं. तिलाच वस्त्रें, भूषणें,अलंकार आदरानें दिले जातात; तिलाच तिलक अहमहमिकेनें लावले जातात. तिलाच मगल—परम मगल समजलें जातें.

ती ज्या खडतर असिधारा व्रतानें दीक्षित असते त्याचा विषय तिचा पती चिरंतन एकमेवाद्वितीय असतो. योगायोगानें; ऐहिक ऋणानुबंधानें तो कसल्याही मातीचा बनला असला आणि वेळीं अवेळीं भंगला तरीही तिच्या व्रतासाठीं तोच एक तिचा पती! त्या अमूर्त पतिकल्पनेचें मूर्त स्वरूप गोमटें असावें आणि जन्मभर लाभावे एवढयासाठींच सारी व्रतें आणि वैकल्यें!

अशा अलौकिक व्रताची साधना प्रत्येक हाडामासांच्या गोळयाकडून करवण्याची आशा धरणें उगीच आहे! "काळी चंद्रकळा नको नेसू अंगणांत." ही तुमची मर्यादा संकेतांचें अवगुंठन झुगारून देऊन, भर चौकात पाठीवर शेपटा सोडून उभी असलेली युवती कशाला मानते?

पण मी हें सर्व कां लिहिलें? भावावून अवश होऊन—होऽ अवश होऊनच—चिरंतन सहानुभूतीच्या भावनेनें लोकांच्या अंतरंगांत शिरून धुंडाळावें हीच तुमची कला;—तिनें मला अवश केलें. लोक म्हणतात

तुम्ही मनकवडे आहां; तुम्ही मनचोर ही पण आहांत अं ऽ!—संथपणें जळणाऱ्या भारी उदबत्तीच्या धुरानें वलय करावें तसें तुमच्या बोलण्याचे भावार्थ वेटोळे घेत जातात. स्नेह दाखवावा, सख्य करावें, विश्वास संपादावा, अगदीं आंतल्या मनातलें, जाणून घ्यावें. तुम्ही कलेचे ' फिफ्थ कॉलम' तर नाहीं?

हस्ताच्या उन्हांत ठेवणीतले भारी भारी शालू शेले टाकावेंत तसें लोक आपलीं मनें, तुमच्याजवळ उघडीं करतात. माझेंही असेंच झालें. जीं अंतःकरणाचीं गुप्त दालनें नेहमीं अंधारांत राहिलीं असतीं तीं तुम्ही पाहिलीं—आपुलकीनें फसवून पाहिलीं. आतां काय राहिलें ?

कुणालाही दाखवूं नका हं हें ! एवढी तरी दया करा. नाहींतर कराल माझी फजिती ! जीवनानं कांठोकांठ भरलेली घागर डोक्यांवर घेऊन महाजनांच्या तीक्ष्ण नजरे समोरून ओलेत्यानं जाण्याची सवय नाहीं मला !

# दीपगृहावरील मध्यरात्र : : ५

" The candle must burn if the chamber is to have light "

कालवांच्या टोपल्यांनीं भरलेली तिची होडी खाडींतील उताराला लागली. गुडघाभर पाण्यांत उतरून तिनें ती वाळूत ओढून घेतली. सांगडीच्या दांड्याला बांधलेला काथ्याचा दोर तिनें कांठच्या दरडीवर रोवलेल्या खुंटाला बांधला.

मावळतीकडे माडाच्या झाडावर सूर्य होता. समुद्रांत खूप खोल उडी घेण्यासाठीं तो एका खूपच उंच झाडावर चढला होता.

पाण्यातून उचलायला सोपें जावें म्हणून होडीच्या तळांत असलेल्या टोपल्या वरतीं फळीवर ठेवण्यासाठीं ती होडींत चढली. दरडीवरच्या लिंबाच्या झाडाखालून त्यानें तिला पाहिलें.

ती गोरी होती यांत कांहीं विशेष नाहीं. बंदरांत पुष्कळ कोळणी गोऱ्या होत्या. ती नाकी डोळी नीटस होती यातही काहीं नाहीं. तो स्वतःही नीटस होता. ती तरूण होती, मुसमुसलेली होती पण नखरेल मुळींच नव्हती. तोही तरूणच होता, रसरसलेला होता; पण त्याला पाहतांच ती जो तिरस्कार व्यक्त करी—मानेनें; डोळयानीं; आणि जिवणीनें—ते हावभाव त्याला लालचीत पाडत.

आतांही तसेंच झालें. तो दरड उतरून खालीं आला. तिनें त्याच्याकडे पाठ फिरविली. तो होडीच्या जवळ आला. ती होडीच्या दुसऱ्या टोकाला गेली. त्यानें दोर सोडून दिला, वल्ही काढून घेतली, आणि होडी ढकलून छातीइतक्या पाण्यात नेली. होडी डुलक्या घेऊं लागली तेव्हा तिनें वळून पाहिलें.

ती संतापानें लाल झाली. त्याला वाटलें ती उन्हानेंच लाल झाली. त्याच्याशीं कांहीं एक न बोलता ती वल्ही शोधू लागली. वल्ही त्याच्या हातात होती.

" सोडतस काय् नाय् होडीचो हात ? "

" होडी सोडून दिली तर तुझो काय गत होयत् ? "

" माझां कांय झाला तरी तुकां सुताक नाय् ना ? सोड होडी. तुकां आसरा झपाटो ! "

" तुका देवचार लागो ! ही सोडलांय् होडी. जा खुशाल दर्यांत वहात!"

त्यानें होडी सोडून दिली. तिनें मुळींच विचार केला नाहीं. काचा पदर कसून तिनें खाडींत उडी टाकली. चार हात पोहतांच तिचे पाय जमीनीला लागले. कमरेइतक्या पाण्यात येऊन तिनें मागें वळून पाहिलें. त्यानें होडी ओढून तिच्या मागोमाग आणली होती.

" अगे माझे आंगऱ्याचे राण्ये; तुका इतको राग कित्याक आयलो ? "

तिनें त्याला पुढें बोलू दिलें नाहीं. फणकारत सरळ ती आपल्या बापाच्या झोंपडींत गेली. त्यानें ती होडी ओढून कांठाला बाधली. वाटेनें जाणाऱ्या एका पोऱ्याला धरून, त्याच्या डोक्यावर त्यांतली एक टोपली दिली आणि दुसरी आपण डोक्यावर घेऊन तिच्या पाठोपाठ तो गेला.

अशा रीतीनें सगळ्या टोपल्या त्यानें तिच्या मांडवांत आणून मांडल्या तरी ती शांत झाली नाहीं.

साऱ्या बंदरांत बदनाम होता तो. सारे त्याला भीत. कुणी त्याच्या वाटेला जात नसे. तो कुणाच्या वाटेला गेला तरी कुणी सहसा तक्रार करीत नसे. केली तरी कुणाचे काहीं चालत नसे. त्याची आई मोठी जहांबाज होती. ती इतका आरडा ओरडा करी कीं तिच्यापुढें कुणाची बोलण्याचीही छाती नसे.

तो काटक आणि अवखळ होता. बंदरापासून समुद्रांत मैलावर दूर असलेल्या दीपघरापर्यंत तो सहज पोहत जाऊन परत येई. त्या उथळ खडकाळ, धोकेबाज बंदराचा खडक नि खडक त्याला माहीत होता.

पश्चिम किनाऱ्यावर याच्याइतकें वाईट बंदर नाहीं. नाइलाज म्हणूनच जहाजें यात येतात. उत्तरेकडे एका उंच सुळक्यावर एक जुना पडीक शिलाहारकालीन किल्ला आहे. त्या लगतच काहीं अंतर खोलपाणी असून कांहीं नैसर्गिक व काहीं कृत्रिम असा धक्का बनला आहे. आणि त्या पलीकडे दोन मैलपर्यंत पुरुष दोन पुरुष खोलीचा समुद्र पसरला आहे. त्यात असंख्य खडक वर आलेले व लपलेले आहेत. लपलेल्या खडकांवर नाविकाना इषारा देणाऱ्या लहान लहान लाल निशाणाच्या सांखळीनें बांधलेल्या, पांढऱ्या खेळातल्या होड्या नेहमीं डोलत असतात. समुद्रांत मैलभर आंत गेलल्या या उथळीच्या अगदीं टोंकाला शिलाहारांनीं बांधलेलें एक दीपगृह आहे. आणि त्यावर दररोज दिवे लावण्याचें काम तिच्या बापाच्या घराण्यांत वंशपरपरा चाललेलें आहे. त्यासाठीं त्यानां इनामही पण सुटलें आहे.

वसती, व्यापार किंवा वाहातूक या दृष्टीनें या ठिकाणाला कांहींच महत्व नाहीं. पण दूरवर विस्तारलेल्या उथळ समुद्रात व खाडींत सर्व प्रकारची मासळी मुबलक सापडते. म्हणून प्राचीन कालापासून येथें एक छोटीसी सोन कोळ्यांची वस्ती आहे. पूर्वी हे लोक आपली मासळी बोटीनें मुंबईला पाठवीत पण आत सात आठ मैल घाटी चढून गेले म्हणजे झालें. रागले गांवापर्यंत मोटार येते आणि मोटारीनें मांसळी थेट मुंबईला जाते.

तिच्या बापानें तिची फिर्याद पाटलाला सांगितली. पाटलानें पंचायत बोलाविली. त्याच्या आईनें पंचायतींत येऊन खूप धिंगाणा घातला. पण पंचायतीनें त्याला गुन्हेगार ठरवून वीस रुपये दंड घेतला व वीस रुपये नुकसान भरपाई वसूल करून तिला देवविले.

केल्या अपराधाचें प्रायश्चित्त भोगावें लागल्याचा त्याचा हा पहिलाच प्रसंग. पण त्यानें उभ्या जमातीपुढें प्रतिज्ञा केली कीं: " एकादिशा ह्यचो बदला घेयना तर मी माझ्यां अवसाचो कुसात जलमलायना. "

त्याची भाडकुदळ आई होतीच तशी. तिची आई, आजी, पणजी, सर्व त्या बंदरांत एकाहून एक प्रसिद्ध होऊन गेल्या. त्या पणजीच्या पणजीनें तर आंगरे सरकारशी भांडण केलें होतें. आंगऱ्यानीं आपल्या हद्दींतील कोळणींवर जोबनपट्टी नावाचा एक जुलमी कर बसविला होता. आणि तो दिल्याशिवाय कोळणींना ते चोळी वापरूं देत नसत व करासाठीं छळीत. या जुलमामुळें किती तरी कोळ्यांची वस्ती फिरंग्यांच्या देशांत निघून गेली. या पणजीनें कर दिलाच नाहीं; पण शिपायानीं जेव्हां तिला सरकारपुढें उभे केलें तेव्हां तिनें त्याची अशी काहीं शोभा केली कीं तिला आपल्यासमोरून नेण्याचा हुकूमच फक्त ते देऊं शकले. पुढें ती शिपायाच्या पहाऱ्यातून पळून आपल्या बंदरांत आली पण कुणीही तिला छेडलें नाहीं.

तक्रारीमागून तक्रारी पंचायतीपुढें येऊं लागल्या. त्याचा जरब उडाला. त्याला आपल्या पहिल्या अपमानाचा विचार करण्याचे प्रसंग वारवार आले—त्याला कारण झालेल्या पोरीचें चिंतन अहर्नीश झालें. ती त्याच्या मनांत भरून राहिली. आणि त्याच्या आईनें रीतसर तिच्या बापाजवळ मुलीला मागणी घातली. आणि तिच्या बापानेंही ती रीतसर नाकारली. तो अधीकच भडकला. त्यानें चार लोकांसमक्ष तिचा विनयभंग करण्याची शपथ घेतली.

जातीच्या सर्व समंजस लोकांनीं तिच्या बापाला समजाविलें कीं:— याहून चांगली सोयरीक तुला लाभणार नाहीं. मुलगा चांगला हुषार, होतकरू आहे, शूर आहे. जाळें घेऊन समुद्रात धावणाऱ्या एका देवमाशाशीं देखील सामना करून त्यानें आपल्या कोयतीनें त्याच्या वर्मी भोंसकलें व दोघेही भरतीबरोबर धडपडत येऊन किनाऱ्यावर वाळूत पडले

ते लोकांनीं ओढून घेतले. तूं आपली मुलगी त्याला देऊन हा तंटा मिटव. जुळवल्यानें जुळतें. तोडल्यानें तुटतेंच.

बापानें मुलीला विचारलें. तिनें नाहीं म्हटलें तरी तें न मानतां तो त्याच्या आईकडे विचारायला गेला पण तिचा पारा चढला होता. ती म्हणाली—"तुझां चेडुंसारखें पांच चेडुं माझा चेडाक न्यहारिक लागतलें."

जातीतल्या अनेक पोरी त्याला सांगून आल्या पण त्यानें बोलून दाखविलें. " अगोदर माझा शपाथ सोडवतलो—"

सारे लोक आपल्या ठिकाणीं चपापून राहिले, तिचीं माणसें तिला रात्रंदिवस डोळयांत तेल घालून जपूं लागलीं; पण त्यानें कांहीं केलें नाहीं. कांहीं काळानें झाल्या गेल्या गोष्टी विसरांत गेल्या. पण तिचें कुठेंही जुळलें नाहीं. परगांवचे एक दोन तरूण कोळी येऊन तिला पाहून पसंत करून गेले. पण परत जातांना त्यानें त्यांना गाठून अशी दहशत घातली कीं ते पुन्हां फिरकलेही नाहींत.

तिला यातली काहींच कल्पना नव्हती. ती आपल्याच रंगांत दंग होती. भरास आलेल्या पोफळीसारखी ती फोंफावत होती. पिकलेल्या फणसासारखी दरवळत होती. पाडाला आलेल्या आंब्यासारखी बहरली होती. कोंवळ्या शहाळीसारखी रसभरित आणि निबरल्या माडीसारखी मदभरीत होती.

सूर्य कलतीला लागला कीं तिचा बाप होडी घेऊन दीपघराकडे जाई आणि दिसेनासें होण्यापूर्वी तेथें दिवे लावून परत येई. सूर्य उगवला कीं ती जाळें घेऊन खाडीकडे जाई आणि तो माथ्यावर येण्यापूर्वी मासळीनें भरलेली टोपली डोईवर घेऊन परत येई.

सकाळीं न्याहारी करून त्याची आई रागलें गांवच्या बाजाराला जाई आणि तो आपला मचवा घेऊन बंदरात जाई. सायकाळीं आई डोक्यावर सामानाचें गाठोडें घेऊन अंधार पडल्यावर परत आली तरी तो बंदरावरील हॉटेलात बसलेला असे.

असाच एके दिवशीं सायंकाळीं तो हॉटेलात बसलेला असतांना ती घाईघाईनें धक्क्यावर आली. सूर्यास्ताला अजून बराच अवकाश असताना अभ्रें झाकाळून येऊन अंधार पडूं लागला होता. वारा सोसाट्यानें

वहात होता. पावसाचे थेंबही येत होते. समुद्राच्या पोटांत चलबिचल झाली होती. तिनें इकडे तिकडे पाहिलें. एक मोठी होडी काठीनें ओढून घेऊन त्यात ती उतरली. त्यानें धक्क्यापाशीं येऊन म्हटलें:—" खंय् चललय् गो ?"

" तुका काय करूंचा आसा ?"

" जौळ येवंक लागलाव तो दिसला नाय काय ?" त्यानें नैऋत्येकडे दूरवर पाहून म्हटलें.

" पण दीपघरांत दिवे कोण तुझी आवस लायत काय ?"

" तुझो बापुस खंय गेलो ?"

" त्यांका हुडहुडी भरलिसा."

" मग शेजार चो पाटलाक कित्याक नाय सांगलय् ?"

" पाटील गांवाक गेलेसत "

" पण तू जाव नको दर्यो खवंळतलो आसा."

"—आणिक जावचाच आसा तर माका बरोबर घेऊन जांव."

" चल मेल्या, जा माडीच्या पिंपांत बुडून मर."

तिनें होडी वल्हवली आणि तो हंसत परत हॉटेलपाशीं आला. त्यानें एक चहाचा ढोंस—जादा—आणि जादा—आणि अवेळीं घेतला त्या हॉटेलांत.

चार घटकेनें खरोखरीच वादळ आलें. होड्या, नांवां, तारवे, तराफे, पडाव, मचवे, गलबतें सर्व बंदरांत आश्रयाला येऊन ठिकठिकाणीं बांधली, रोवलीं, नागरली जाऊन डुलत हिंदकळत थबकत होती. अजून अंधार पडला नव्हता. सर्व नाखवे आश्रयाला आले होते. एक वाफोर कांहीं अंतरावर धूर सोडीत होता. वादळाचा घों घों आवाज दुमदुमून राहिला होता. काळ्या आकाशाच्या पार्श्वभूमीवर धूसरशा दीपगृहातील लाल उजेड तुफान लाटांवरून चमकत होता.

तो धक्क्यावरील हॉटेलच्या पडवीत विड्या फुंकीत हॉटेलवाल्याबरोबर गप्पा मारीत बसला होता. त्यानें लाब दीपगृहाच्या दिशेला एक होडी बंदराकडे येतांना पाहिली. तो वेगानें धक्क्याकडे गेला आणि तेथें असलेल्या कस्टमच्या सरकारी पाढऱ्या उथळ पडावांत उतरूं लागला. एका

नाखव्यानें त्याला हटकले !—“ काय वेडो आसंय रे ? अशा वादाळात खंय जातय ? जीव देवक ? ”

त्यानें त्या अंधुक ठिपक्याप्रमाणें दिसणाऱ्या होडीकडे फक्त बोट दाखविलें आणि वल्हं मारलें. नाखवा म्हणाला. “ बुडाना तां होडक्यां दर्यांत ! ”

धक्यावर आदळून परत जाणारी महाजू लाट त्याच्या त्या पाढऱ्या पडावाला दूरवर घेऊन गेली. आपली शिकस्त करून त्यानें पडाव त्या होडीच्या दिशेनें चालवला. तीही आपली शिकस्त करून हळूहळू त्याचे कडे येत होती.

अनेक मजले उंच उसळणाऱ्या लाटा—त्यांना जत्रेंतले पाळणें वर खालीं फेंकावेत तशा फेंकीत होत्या. जोरानें पावसाची एक सर आली; जोरानें वाऱ्याची वावटळ आली. चार दोन गिरक्या खाऊन तिची होडी उपडी झाली. तिनें ती धरण्याचा यत्न केला पण ती अडवी होऊन बुडाली. निरुपाय होऊन ती पोहूं लागली.

बेभान होऊन तो आपली वल्हीं मारूं लागला पण अंतर तुटतां तुटेना. ती थकली आहे असे त्याला दिसून आले. एक हात तिनें उंच केला होता. त्यानें उशी घेऊन दूरदूर लांब उडी मारली. अगदीं वेळेला तो येऊन पोंचला. खोल पाण्यात बुडून त्यानें तिला धरले. तिच्या पोटाशीं खोवलेल्या कोयत्याची मूठ त्याच्या हाताला लागली. तो पाण्याबाहेर डोकें काढून इकडे तिकडे पहातो तोंच त्याचा हात हलका पडला. तिच्या कोयत्यानें तिच्या कमरेचे वस्त्र फाडले जाऊन तो त्याच्या हातांत राहिला आणि ती वेगानें तळाशीं जाऊ लागली.एक सुळकाडी मारून त्यानें तिच्या कमरेला विळखा घातला आणि ती त्याच्या गळयांत पडून मूर्छीत झाली.

तिला पाठीवर टाकून तो कितीतरी वेळ अधारांत पोहत होता. कुठल्यातरी उजेडाचे दिशेनें आपण पाणी कापीत आहों. एवढीच त्याला जाणीव होती.

वादळ शांत झालें. आकाश उजळलें. चांदणी डोकावूं लागली. आणि तो दीपगृहाच्या खडकाला येऊन लागला. त्यानें तिला तसेंच उचलून दीपगृहावरील मेघडंबरीत नेले. दिवे पुसून टाकलेल्या तेलकट चिंध्या..

ावत, कागद, पाचोळा काड्या काटक्या सर्व कांहीं गोळा करून त्यानें तेच्या जवळ शेकोटी केली. शेकोटीच्या उजेडांत त्यानें तिच्याकडे पाहिलें आणि तिनें डोळे उघडले. तिच्या अंगावर कांहींच राहिलें नव्हते. तिनें पुन्हां डोळे मिटले. आणि तो खालीं उतरून गेला. कमरेला कसून बांध-लेल्या आपल्या नेसत्या वस्त्राची एक पट्टी काढून त्यानें त्याची लंगोटी कसली आणि संबंध वस्त्र पिळून, झटकून, इडकून तिच्याभोंवतीं गुंडाळलें. सबंध खडकावर फिरून जळण्याजोगें जें कांहीं सापडलें तें आणून त्यानें शेकोटींत टाकलें. तिचा श्वास संथ चालत होता. तिची ग्लानी सरून ती पुन्हा लौकरच डोळे उघडील असें दिसूं लागलें.

आणि त्याला आपल्या प्रतिज्ञेची अठवण झाली. लालस दृष्टीनें त्यानें तिच्याकडे पाहिलें. शेकोटींतील ज्वालेकडे स्थिर दृष्टीनें पहात तो किती-तरी वेळ विचार करीत राहिला:—

' ती त्याचीच होती. त्याच्याच जिवापाड धडपडीनें ती वाचली होती. त्याच्याच वस्त्रानें ती अवगुंठित होती. तिचे ओठ हालले. त्यावर स्मित झळकू लागलें. त्या आकर्षक ओठावर आपलेपणाचा मोर्तब करण्यासाठीं त्यानें आपले ओठ अगदीं जवळ नेले.

पण छेः ! विटंबना करणारांत कधींही नसणारी एक नाजूक भावना त्याच्या अतःकरणात उदित झाली होती. ती भावना अपमान होऊं देत नाहीं—केसाला धक्का लागूं देत नाहीं, स्पर्श देखील हळुवार करवते.

त्यानें तिच्या केसावरून हात फिरविला. तिचें आपण रक्षण केलें ती आपलीच आहे. तिला आपण यत्किंचितही दुखवितां कामा नये. कठोर विचार त्याच्या मनांत येईचनात. तिच्या संबंधीं गोड गोड कल्पना करीत तो तिच्या शेजारीं बसला.

कांहीं वेळानें तिनें डोळे उघडले. कितीतरी वेळ त्याच्याकडे टक लावून पाहिलें. आणि नंतर ती उठून बसली. तिनें आपलें वस्त्र सांवरून घेतलें. इकडे तिकडे पाहिलें. तिच्या दृष्टींत भयभीत चंचलता होती. तो ओशाळून दूर मेहरपीत जाऊन बाहेर आकाशाकडे पहात राहिला.

त्याच्याचकडे पहात ती सारखे कांहीं तरी आठवीत होती. शेवटीं ती

उठून त्याच्याजवळ येऊन उभी राहिली आणि एकदम स्फुंदून रडूं लागली. त्यानें अगदीं नाजुकपणें विचारलें:—

" आं—रडांक काय झाला ? "

ती आणखी स्फुदूं लागली आणि घळघळां अश्रु वाहूं लागले तिच्या गालावर. त्यानें तिच्या गोऱ्या खांद्यावर हात ठेवला पण ती दूर झाली नाहीं.

कांही वेळानें ती म्हणाली:—

" तू माका उगाच वांचयलंय् ! "

" देवानं वाचवलां "

" मी थकलंय, बुडलंय, अन् कुणाक तरी मिठी मारलय्–तू माका हंय कसां आणलय ? "

" पोहत पोहत "

तिनें आपल्या अंगावरील पांढऱ्या वस्त्राकडे साभिप्राय पाहिलें. त्यानें झाली हकीगत थोडक्यांत तिला सांगितली. कृतज्ञतेनें भरलेल्या काळ्या भोर डोळ्यानीं त्याच्याकडे तिनें पाहिलें.

" खरांच; तू माका कित्याक वाचयलंय ? " रात्र सरत होती, दिशा उजळत होती, समुद्र शांतवत होता तेव्हां ती त्याला म्हणत होती.

" तू माका हवीं होतय म्हणून. "

" अन् मी तुझी झालांय नाय तर ? "

" तर–तर मी तुका मारून टाकीन "

आणिक कांहीं वेळ गेला. तो समुद्रांत जाऊं लागला.

ती म्हणाली:—

" खंय चललय ? "

" बंदराकडाक "

" अन माका सोडून ? "

" तुका नेण्याक बदरातून होडयां आणतंय "

" फीर मागां. मी सुद्धां बरोबर येतय् "

" छट्, असां कसां व्हईत ? " तो परत येत म्हणाला.

" आपण दोघां मिळून जावयां खबुतरावाणी " हा गांवच्या प्रत्येक

तरूण कोळणीला पाठ असलेला लोक गीताचा चरण गुणगुणत तिनें दीपगृहाचे दार उघडलें; आत जाऊन दिवे मालविले; आणि येतांना दीपगृहाच्या देवळीत वेळेला उपयोगी यावी म्हणून तिच्या बापानें ठेवलेली देवदाराची सागड बरोबर आणली. तो उल्हसित होऊन म्हणालाः—

" बरा झालां. माका ती दिसली नाय—नाय तर रात्रीच तुला उब देवऱ्यासाठी ती मी आगीत टाकलीं असतीं. "

त्या सागडीवरून ती उभयता बंदराकडे यायला निघाली. किल्यापलीकडे ते लागले तेव्हां सूर्य बराच वर आला होता. चागला दहा घटका दिवस होऊन गेला होता. आपण पोहत आलों असतों तर कितीतरी लौकर आलों असतों असें त्याला वाटले. कसा वेळ गेला हें त्याना कळले देखील नाही.

किनाऱ्यावर उतरतांच ती तडक आपल्या बापाच्या झोंपडीकडे गेली. तो आपल्या घराकडे गेला. तिच्या बापाच्या झोपडींत अर्धी जात गोळा झाली होती. मुलगी रात्रीं घरीं आली नाहीं तेव्हा तिच्या बापानें बोभाट केला होता.

तो घरी आला तेव्हा कस्टमचे आणि पोलिसचे लोक त्याच्यासाठीं बसलेले होते; कस्टमचा पांढरा पडाव बंदरातून नेतांना ज्या नाखव्यानें त्याला पाहिले होतें त्याच्या जबानीवरून सरकारी माल चोरल्याचा आरोप त्याच्यावर होता.

रात्रीं आपण कुठें होतों हें तिनें कुणाला सागितलें नाहीं. आपण सरकारी पडावाचें काय केले हें त्यानें कुणाला सागितलें नाहीं. पण सकाळीं किल्यापलीकडीळ समुद्रकिनाऱ्यावरून हंसत खेळत येताना काहीं नाविकानी त्याना पाहिले होतें. सरकारी पडावही किल्याच्या बुरूजाला आदळून फुटलेला सापडला होता.

सरकारी नुकसानीला कारण झाल्याच्या आरोपावरून त्याला एक महिन्याची शिक्षा झाली. त्यानें तिला त्यारात्रीं पळवून नेऊन भ्रष्टविलें असे जातीनें ठरविले. त्याला जातीनें काहीं केलें नाहीं. तिला बाहेर टाकले.

तुरुंगांतून परत आल्यानंतर एकदां त्यानें तिला म्हटलें:—तूं माझीं आंसय; मी जातीक दंड भरून तुझ्या बरोबर लग्न करायतलों. "

" नाय्–नाय्–नाय्. "

" बघ तुका दूसरो कुणी कबूल करीत नाय."

" मी एकली जगूंक शकतंय्."

चार महिन्यांनीं पुन्हा वादळ आलें. अभ्रे झांकाळून येऊन अंधेर पडला. वारा सोसाटयानें वाहू लागला. होडया, नावां, पडाव, तारवें तराफे; गलबतें; बदरांत आश्रयाला आलीं. तुफान लाटा धक्क्यावर आदळून फेसाळूं लागल्या. पाऊस पडूं लागला. किल्यातील देवीला बोणें करून ती धक्क्यावरून परत येत होती. तो घाईघाईनें धक्क्यावर आला. कस्टमचा नवा पांढरा पडाव धक्क्याला बांधलेला होता. तो सोडून त्यांत तो उतरू लागला. तिनें त्याला हटकलें:––खंय चललय ?"

" दीपघरा कडंय् "

" कशाक ? "

" रात्र करमुंक."

ती थोडा वेळ घुटमळली आणि म्हणाली:––

" फिर मागा "

" कशाक ? "

" मी तुझी होयन "

तो निमूटपणें तिच्या मागें परतला.

## अनुराधेचें स्वप्न : : ६

काळोख्या रात्रीं घराच्या गच्चीवर आकाशांतील नक्षत्रें मोजीत तो आराम खुर्चीवर पडला होता. खालीं मुलें रडत होतीं आणि बाकीचीं ओरडत होतीं. दिवसभराच्या दगदगीनें त्याचें अंग दुखून आलें होतें. मन प्रसन्न नव्हतें. मध्येंच कांहीं लहानसे ढग एखाद्या नक्षत्रपुंजा-वरून जात. मध्येंच कांहीं अस्पष्ट विचार त्याच्या मनांत येऊन जात. वारा वहात नव्हता. चंद्र अजून उगवला नव्हता. धुराळा बसला नव्हता, आणि गांवचा गोंगाटहि थांबला नव्हता.

" जेवायला चलावें " ती वर येऊन म्हणाली.

" मला जेवायचें नाहीं असें मघाशींच नाहीं कां सांगितलं ? "

"होय का? मुलांच्या ओरडण्यात ऐकूंच आलें नाहीं तर. कुठं काय झालं होतं आज?"

"कांहीं विशेष नाहीं. त्या कस्तूरभाई प्रेमचंदकडे अनुराधा आपल्या राणीसाहेबांबरोबर आली आहे. तिथें थोडें चहापाणी झालें."

"अनुत्रन्संच्या बद्दल इतकं सांगणं होतं, पण त्याना घरींसुद्धां कधीं बोलवायचं नाहीं."

याचें उत्तर तिला मिळालें नाहीं. कांहीं वेळानें कंटाळून ती निघून गेली. तो आपल्या दिनक्रमाची आठवण करूं लागला. पहाटे आपण जागे झालों तेव्हा ती अजून झोंपलीच होती. तिचें विविध प्रकारें चुंबन घेतलें. सकाळीं एका देणेकऱ्यानें येऊन विनाकारण तंटा केला. दुपारीं ऑफिसांत सरकारकुनानें दुसऱ्याचें काम आपल्यावर लादलें. सायंकाळीं शेटजींच्याकडून निरोप आला कीं, मिसेस सावळे दिल्लीहून आल्या आहेत. आपल्याला भेटायला बोलावलें आहे. ऑफिस सुटताच आपण शेटजींच्या बंगल्यावर गेलों. राणीसाहेबाशीं ओळख करून देतांना अनुराधेनें म्हटलें, "हे एक्साइज खात्यात फडणीस आहेत."

त्याला हें वाक्य रुचलें नाहीं. स्वतःचें चरित्र डोळयापुढें उभें राहिलें. तें कांहीं मोठेंसें अपूर्व नव्हतें. ठराविक चाकोरींतून त्याचें शिक्षण गेलें होतें. वडिलांनीं प्रयत्नानें थोडी माया करून ठेवली होती. वकिली चालत नाहीं असें पाहून त्यानें सरकारी नोकरी धरली होती. चांगला हुंडा घेऊन आणि चागल्या शेंपन्नास मुली पाहून त्यानें लग्न केलें होतें. सुदैवानें बरं वाईट देवाघरचें देणें लाभलें होतें. सुरळीत आणि सुखवस्तु संसार आज तागायत झाला होता.

चहापाणी झालं आणि अनुराधा खालीं त्याला पोंचवायला आली.

"उद्या संध्याकाळीं राणीसाहेबांना कुणा सरदारांकडे मेजवानी आहे. मी जाणार नाहीं. घरींच राहीन. तुम्ही उद्यां याल का? परवाचे दिवशीं आम्ही मुंबईस जाणार."

"जरुर येईन, पण—"

"पणबिण कांहीं नाहीं. याच. मी याचवेळीं उद्यां वाट पहात राहीन."

आपल्या मनांत तिला घरीं बोलवायचें होतें पण तें तसेंच राहिलें आणि आपण निघून आलों. इ. इ.

आपल्या केंसावरून हात फिरवल्याचा भास झाला तेव्हां तो जागा झाला.

" इथंच झोंप लागली वाटतं " ती म्हणत होती.

" कां येत नाहींस ? " त्यानें विचारलें.

" स्वप्नातच अनुवन्संना घरी बोलावणें चाललं आहे वाटतं ? कां त्या इथें आल्या आहेत हें सुद्धा स्वप्नच होतं ? "

त्यानें डोळे उघडून पाहिलें तों एक कृष्ण मेघ समोरच्या तारकापुंजावरून जात होता.

" आंत चलावना आतां. "

त्याला आपलें वाटलें, आकाशांतील अनंत तारकांची तिला भीति वाटत असावी.

आंत गेल्यावर तो बराच वेळ या कुशीवरून त्या कुशीवर करीत होता.

" अनुवन्सं ह्मणे सासरीं नादत नाहींत. होय ना ? "

" हं ऽ हं ऽ ऽ "

" मग त्या माहेरीं कां रहात नाहींत ? "

याचें उत्तर तिला मिळालें नाहीं. थोड्या वेळानें एक दारुबाजांचा घोळका खालीं रस्त्यावरून जाऊं लागला. त्यांतील एक गात होता.

" माथ्यावर चंद्र किं ग ढळला ऽ ऽ ऽ "

त्यानें उठून पाहिलें तों तिला गाढ झोंप लागली होती. चहुंकडे शांत होतें. वारा वहात नव्हता. पान सुद्धां हालत नव्हतें. आज आपली प्रकृति बरी नसावी असें त्यानें मनाला सांगण्याचा प्रयत्न केला. नंतर त्यानें कपडे घातले. जिनें उतरून बाहेरच्या दाराला कुलूप लावलें, आणि शेटजींच्या बंगल्याच्या दिशेनें तो चालू लागला.

वाटेंत त्याला कुणीं भेटले नाहीं. शेटजींचा बंगला अगदीं शांत होता. ज्या पश्चिमेकडच्या खोल्या राणीसाहेबांना दिल्या होत्या त्यातील एकींत मात्र दिवा झगझगत होता. बंगल्याच्या दोन्ही बाजूला रस्ते होते. बागेच्या बैठ्या भिंतीवरून काहीं झाडें डोकावत होतीं. खोलींत कुणीतरी हिंडत

असलेलें दुधी रंगाच्या काचांवर पडलेल्या सावलीवरून दिसत होतें. मध्येंच थोडा वेळ दिवा बंद केला जात होता.

पुन्हां तोच दारुबाजांचा घोळका त्या ठिकाणीं त्याला भेटला. त्यांतील तो गाणारा म्हणत होता—

" जशी शुक्राची चादणी ऽ ग ऽऽऽ "

दुसरा एक त्याला म्हणूं लागला " रामराम दादा, इकडं कुणिकडे गुंगल्यास ! "

तो झाडाआड लपला. काळोख होता तरी अनुराधा खिडकींत येऊन आपल्याला पाहील अशी त्याला भीति वाटली. थोड्यावेळानें वारा सुरू झाला. त्याचें मन शात झालें. तिथें डुलकी येऊं लागली. तेव्हां वेगानें तो घरीं आला. अजून ती जागी झाली नव्हती.

सकाळीं त्याला उठायला खूपच उशीर झाला. सकाळी त्याच्याकडे कुणीहि भेटायला आलें नाहीं. दुपारीं ऑफिसांत त्याच्या हातून अक्षम्य चुका झाल्या. संध्याकाळ होताच तो प्रेमचंद शेटजींच्या बंगल्यावर गेला.

" समदं भाइर गेल्याती. एक पाव्हन्या बाई फकत हायती. कुनाचीशी वाट बघत्याती पगा. "

" जा मी आलों आहें म्हणून सांग. " त्यानें एक जुने मळकटलेसें व्हिजिटिंग कार्ड काढून दिलें.

काहीं वेळानें नोकरानें त्याला एका लहानशा खोलींत नेऊन बसविलें. कांहीं वेळ छताकडे पाहात खुर्चीवर बसून कंटाळल्यावर त्यानें इकडे तिकडे पाहिलें. तारेचा पलंग, एक टॉयलेटचें कपाट, तीनचार उच पाठीच्या खुर्च्या, आणि छोटें टेबल, येवढें सामान व्यवस्थित लावलेलें होतें. पलंगाच्या मच्छरदाणीच्या चौकटीवर एकदोन पातळें, टॉयलेटच्या हॅंगरवर एक टावेल, व दोन ब्लाउझ, गादीवर एक पुस्तक आणि टेबलावर दोनचार वर्तमानपत्रें अव्यवस्थितपणें पडलीं होतीं. त्यानें खिडकींतून बाहेर पाहिलें. " काल रात्रीं आपण वेड्यासारखे ज्या झाडाखालीं कंपाउंडच्या भिंतीवर बसलों होतों... " तें सर्वच त्याला एक लाजिरवाणें स्वप्न वाटूं लागलें.

ज्या एका महत्त्वाच्या प्रसंगानें या भेटीच्या प्रसंगीं त्याला अस्वस्थ केलें होतें, ज्याची कारणमीमांसा करतां न आल्यामुळें त्याला सारखी हुरहुर लागली होती आणि ज्याची गोड आठवण त्याला अजून रोमांचित करीत होती, तो त्याच्या आयुष्यातील एक अत्यंत चमत्कारिक योगायोग होता.

आणि जेव्हां अनुराधा स्प्रिगनें नेहमीं बंद राहणारा खोलीचा दरवाजा उघडून आंत आली तेव्हां कारण नसतां त्याचें हृदय भीतीनें कंपित झालें.

" माफ करा हं. तुम्हांला फार वेळ बसावं लागलं. "

बाथरूममधून ती आल्यासारखी दिसली. केसाच्या ओल्या बटा गालावर आणि कपाळावर रुळत होत्या. डोळ्याना फार श्रम झाल्यासारखे दिसत होते. नाकाचा शेंडा किंचित् लाल झालासा दिसत होता. झाडाच्या पानासारखें हिरव्या रंगाचें पातळ आणि ब्लाउझ तिनें वापरला होता.

" फारच उकडलं नाहीं दुपारीं! आग धुतल्यानं तरी बरं वाटेल म्हटलं. " तिनें आरशासमोर केंसावरून फणी फिरवीत आणि कुंकू लावीत म्हटलें.

तो खिडकीच्या दाराला टेकून तिच्याकडे पाहातच राहिला. नोकरानें चहाचा ट्रे आणून टेबलावर ठेवला. तिनें दोन खुर्च्या टेबलाजवळ ओढल्या आणि म्हटलें, " बाहेर इतकें पाहण्यासारखें काहीं आहे काय?"

खालच्या नजरेनें तो खुर्चीवर येऊन बसला. अनुराधेनें कपांत चहा ओतीत म्हटलें, " या केक्स राणीसाहेबानीं स्वतः तयार केलेल्या आहेत. "

चहा पीत असता पलंगावरील विस्कटलेल्या चादरीशिवाय आणि कुस्करलेल्या गुलाबाच्या पाकळ्यांशिवाय इकडे तिकडे पाहण्याचें त्याला धैर्य झालें नाहीं.

" आणखी हवा का ? " अनुराधेनें विचारलें.

" नको. "

" आग्रह म्हणून नव्हे पण..."

" मग अगदीं थोडा. "

" आणि या त्रिवेणी वड्या तर पाहिल्याच नाहींत. हा पांढरा थर बदामांचा, हिरवा पिस्त्यांचा आणि तो केशरी खवा् खोबरें आहे. "

" खरोखरच चांगल्या आहेत, पण आतां पुरे. "

" ही लवंग सुपारी या बशींत आहे. "

" तुम्ही माझ्यासाठीं विनाकारण श्रम घेतलेत. "

" जितके तुम्हीं इथें येण्यात घेतलेत. "

नोकर चहाचें ट्रे उचलून घेऊन गेल्यावर पलंगाखालीं कांहीं कागद चुरगळून टाकलेले त्याच्या दृष्टीस पडले. त्याला कल्पना आली कीं या गोष्टी अनुच्या चित्ताची अस्वस्थता सुचवितात. तो चुळबुळ करूं लागला.

" का कुठं जायची घाई आहे कां ? "

" मुळींच नाहीं. "

" अलीकडे आमच्या घरीं गेलां होतां काय ? "

तिनें खिडकींतून बाहेर पाहात विचारलें, त्यानें उत्तर दिलें नाहीं. विस्कटलेली चादर आणि चुरगळलेलें चिटोरें आणि कुस्करलेलीं फुलें हेंच त्याच्या मनांत घोळत होतें.

" आमच्या घरचें कुणी कधीं भेटलं होतं कां ? "

" नाहीं म्हटलें सासरीं का माहेरीं ? " त्यानें जरा घुटमळत विचारलें.

तिचा चेहरा गोरामोरा झाला. त्याला वाटलें उगीच आपण हा प्रश्न विचारला. " तुम्हाला वाईट का वाटलं ? मला खरोखरीच माहीत नाहीं तुमचे सासरशीं संबंध कसे राहिले आहेत. "

" तसं नाहीं. पण पूर्वीं तुम्ही मला अनु म्हणून एकेरी हांक मारीत होतां... "

" पण आता... "

" आतां काय बदललं आहे ? "

" पण तें कसंसंच दिसेल. "

" कुणाला ? "

ती पलंगावर येऊन टेकली. आणि थोड्या वेळानें म्हणाली.

" अगदीं बाळसुद्धा भेटला नव्हता अलीकडे ? "

" मी चवकशी केली. तो सुटींत म्हणे मावशीकडे गेला आहे. "

" आणि बाबांचा माझ्यावरचा राग जशाचा तसाच आहे ? मला आईबद्दल फार वाटतं. तिला काय वाटत असेल ? "

" तुमचे यजमान मात्र वारंवार भेटतात आणि बोलतातहि मोकळेपणें."

तिच्या डोळयांत पाणी उभें राहिलें.

" राणीसाहेबांबरोबर प्रवास बराच करावा लागतो वाटतें ?" त्यानें तिला शांत करण्याच्या हेतूनें विषय बदलला.

" आपण लहान होतों तेव्हां तुम्ही आमच्या घरीं कित्ती कित्ती येत होतां ! आतां कां नाहीं जात बरं ?"

" खरंच आठवतात तुम्हाला ते दिवस ? त्यावेळीं आपली किती मैत्री होती."

" आणि आपण कुठं भांडत होतों ? मुळींच भांडत नव्हतों."

" आतां तुमच्या घरीं तसं बोलायला तरी कोण आहे ? बाळ तर काय लहानच आहे आणि..."

" आपण तरी काय लहानच होतों त्यावेळीं."

" आणि तसेच राहिलों असतों तर किती बरं झालं असतं."

" तुम्हाला आठवतं का आमच्या घराच्या बोळींत मी एकदां पळतां पळतां पडलें आणि तुम्ही धावत येऊन मला उचललें आणि मी–मी काय बरं केलं ?"

त्याला लाजल्यासारखें झालें. त्याला तें सर्व आठवत होतें. अनुराधेच्या आईनें पाहिलें आणि ती तिला रागें भरूं लागली. अनु म्हणत होती " आपल्या आवडत्या माणसाचे मुके घेतातच मुळीं."

" आठवतं का ? नसेल आठवत. कुठलें आठवायला ? फार दिवस झाले !"

" न आठवायला काय झालं ? मनुष्य मोठा झाला म्हणजे त्याची परिस्थिति आणि दृष्टी दोन्हीहि बदलतात आणि लहानपणाच्या त्या गोड आठवणी न विसरणाऱ्या स्वप्नासारख्या राहतात."

प्रत्यक्ष वस्तुस्थितीची तीव्रता सहन झाली नाहीं म्हणजे मनुष्य त्यांना अमूर्त तत्त्वज्ञानाचें स्वरूप देण्याचा, निदान मनाला तसें भासविण्याचा प्रयत्न करतो.

" तसें कांहीं आपण लहान नव्हतों. आपल्याला सर्व कांहीं कळत होतें आणि लोक आपली थट्टा करीत,–नाहीं का ?"

" आणि तुम्ही किती रागावत आणि रुसत होता ! "

" आणि तुम्ही कितीतरी मनधरणी करावी मग ! "

" त्या पोरवयात मागच्या आळींतल्या मारुतीच्या देवळांत आपण एकमेकांना शपथासुद्धां दिल्या होत्या. "

ती एकदम उठून म्हणाली, " बरं, हवंतर आपण जवळच्या राणीच्या बागेंत फिरायला जाऊं. संध्याकाळ झालीच आहे. उद्या सकाळीं आम्ही जाणार. पुन्हां भेटी गांठी आणि बोलणींचालणीं..."

तो एखाद्या अंकिताप्रमाणें तिच्याबरोबर गेला. बालपणाच्या त्या प्रसंगानंतर गेला तसाच त्यांचा काळ बागेच्या फाटकांत शिरेपर्यंत स्तब्धतेंतच गेला. तिथें ती म्हणाली:–" काय म्हणत होतों आपण ? वयांत आल्यावर परिस्थिति आणि दृष्टि बदलली तरी हृदय बदलतें असें मला नाहीं वाटत. "

त्यानें उत्तर दिलें नाहीं. कदाचित् त्याचें लक्ष नसावें. कोणी ओळखीचें भेटतें का काय म्हणून तो इकडे तिकडे पाहत होता. हिरवळी, खेळण्याच्या जागा, टेनिसकोर्टें, कारंजीं, यांवरून कमळाच्या कृत्रिम तळयाच्या पलीकडे वेळूच्या बेटापर्यंत तीं न बोलतांच गेलीं.

" माझ्या शिकण्यासाठीं मुंबईला आपणांत केवढें अंतर पडलें ! "

" एकदां अंतर पडलें म्हणजे पडतच जातें. तुम्ही लगेच मला विसरून गेलां असाल पण... "

" कां ! मी सुटींत आलों म्हणजे नेहमीं तुमच्याकडे येत असें. "

" होय. आणि तुम्ही प्रत्येक वेळीं एकएक परीक्षा देऊन आलां म्हणजे आम्हांला किती आनंद होत असे. "

त्याला चुटपुट लागली कीं जीवितांतील खऱ्या परीक्षेंत आपण निकस ठरलों.

" आणि माझं लग्न ठरलं तेव्हां तुम्हांला किती आनंद झाला ! " तिनें डोळयांत पाणी आणून म्हटलें.

कितीतरी चुकलें ! आपल्या मनांतील इच्छा अस्पष्टसुद्धां दिसूं नये म्हणून आपण मोठ्या हौसेनें त्या उत्सवांत भाग घेतला !

" मला वाटलं...... आणि नंतर मी तुमच्या लग्नाला आलें नाहीं. "

" मी तुमच्या सासरींसुद्धां कधींमधीं येत असें. "

" होय आणि तुम्हांला माहीत नसेल सासरला विटून मी कां बाहेर पडलें. "

" अगदीं कांहींसुद्धां कल्पना नाहीं. "

" आणि कुणालाच माहीत नाहीं. बाबा रागावले, आई दुःखी झाली, जगानें नावें ठेवलीं...... "

दिवसाच्या प्रकाशाला रंग चढून झाडांना सावल्या येत होत्या. कमळाच्या पानातून वाट काढून बदकें वेगानें जात होतीं. वेळूच्या झाडांतून शीळ घातल्यासारखा आवाज येत होता.

" मी संसारातून कां उठलें ? " तळ्याकडे शून्य दृष्टीनें पहात तिनें स्वतःला म्हटलें.

तो विचार करूं लागला " मनाला निश्चय नाहीं, आशाना तीव्रता नाहीं, तापण्याची तयारी नाहीं, असें नादान जीवित आपण जगलों. ज्या इच्छेमागे त्याग नाहीं ती गुन्हेगारी आहे. अनुराधेला आपण हिऱ्यासारखे दिसलों आणि तिची फसवणूक केली. हरिश्चद्रानें स्वप्नांत दिलेल्या वचनासाठीं केवढा यज्ञ केला ! आपण आपल्या पराक्रमाच्या अभावानें अनुराधेची आहुति घेतली. "

" सगळें स्वप्नवत् झालें " ती म्हणाली. " तुम्हांला आठवत असेल. तुम्ही असेंच सासरीं मला भेटायला आला होता. माजघरांत चहापाणी झाल्यावर आपण बोलत बसलों होतों. काय विषय होता आठवतो कां ? "

" होय. तुकाराम महाराजांच्याबद्दल आपण बोलत होतों. "

" त्यानीं आपल्या असामान्य वागणुकीनें लोकांच्या मनांत कांहीं अपूर्व अपेक्षा उत्पन्न केल्या... "

" आणि त्यांना त्या पुऱ्या करतां आल्या नाहींत. "

" म्हणून त्यानीं इंद्रायणींत जीव दिला... "

" ज्याला भाविक लोक सदेह स्वर्गाला जाणें म्हणतात. "

" आपले विचार किती तंतोतत पटले त्यावेळीं ! मनोमन साक्ष पटल्यासारखें झालें. "

" आणि त्या भरांत... "

" माजघराच्या दारांत तुम्हीं माझे दोन्ही हात हातांत घेतले आणि मी तसेंच राहूं दिले... "

" मी अपराधी आहें. मला... "

" हें वन्संनीं पाहिलं आणि तिकडे सांगितलं. "

एखादा कांचेचा सुंदर जिन्नस आपल्याच हातून पडून फुटावा तसें त्याला झालें. दोन्हीं हातांनीं तोंड झांकून त्या अर्धवट अंधारांत आपलें दुःख लपविण्याचा त्यानें निष्फळ प्रयत्न केला.

" वाईट का वाटून घ्यावें जीवाला? माझें कांहीं नुकसान झालें नाहीं. "

" पण माझें अतोनात झालें. हृदयामध्यें विकृति होऊं दिली आणि तशी कृति करण्याचें मनोबल दाखविलें नाहीं. तुम्हीं ज्याला देव कल्पिलें तो शुद्ध दगड राहिला! सगळा दोषारोप माझ्यावर करून तुम्हीं स्वतःचें संरक्षण केलें असते... "

" तर मला स्वतःशीं प्रतारणा करावी लागली असती. "

" तुमच्याशीं अयोग्य वर्तन करण्याच्या आरोपावर जगाकडून तिरस्कृत झालों असतों तर... "

" मला तुमच्याशीं प्रतारणा करावी लागली असती. "

" हाय! या सगळ्या गोष्टी आधीं कळल्या असत्या तर... "

" तर काय झालें असतें? मी नसतें फसलें का? कुणी कुणाला फसवलें नाहीं. आपण एकमेकाना अयोग्य ठरलों इतकेंच. "

कुणीतरी खोल दरींत टाकून देत आहे असें त्याला झालें. त्याचें अपराधी मन त्याला सागत होतें प्रेमाची दीक्षा घेऊन...पायावर ताठ उभें राहण्याचें बळ नाहीं...ऐहिक सुखाची इच्छा केलीस? पशो, हवन होण्याची योग्यता तुझी. देवता होऊं पाहिलेस!

बागेचा माळी येऊन फाटक बंद करण्याची वेळ झाली असें सागूं लागला...त्याला वाटलें आदमप्रमाणें तुम्हींहि गुन्हेगार आहांत, नंदनवनांतून चालते व्हा असें देवदूतच सांगत आहे.

दोघेंहि परत जायला निघालीं.

" त्याच रात्रीं तिकडून मला जाब विचारणें झालें. मग मी काय केलें असेल? "

" अनु, तूं देवता आहेस. लौकिक आचरण तुझें नाहीं. "

" नाहीं तर खरी माणुसकी कशांत बरं आहे ? फसवून सुख लुटण हा प्रामाणिकांचा धर्मच नाहीं. मी तुमच्या हातांत हात राहूं दिला—अंतरींच्या प्रामाणिक उमाळयानें तो राहिला—मारुतीच्या देवळांत दिलेल्या वचनाच्या बंधनानें राहिला—बाळपणीं आपण होऊन घेतलेल्या चुंबनानें राहिला. आणि असेंच मी तिकडे सांगितलें. "

" अनू, काय केलेंस हें ! "

" अनुराधा नक्षत्रावर अभिसारका बाहेर पडतात म्हणे. "

" होय. आणि आम्हां वंचित संसारी जनापेक्षां त्या कितीतरी प्रामाणिक असतात. "

" आणि त्यांना मनोबलहि असतें. तुम्हाला माहीत असेल पतीचा त्याग करून प्रणयीजनांसाठीं मोहनाराणी सती गेली. "

" आणि लोक तिला हंसले. "

" तिकडची मालकपणाची जाणीव आणि बाबांचा कुलीनत्वाचा अभिमान—सासर माहेर वर्जून हें लोकनिंदित जीवन मी कंठीत आहे. "

" आणि, अनू, हें सगळें माझ्यामुळें—"

" नाहीं. तुम्ही केवळ निमित्तमात्र आहां. मीराबाईच्या गोपालकृष्णाच्या मूर्तिप्रमाणें तुम्ही झालां. "

" मी तुझ्या दुःखाला कारण झालों. "

" मला दुःख झालेंच नाहीं. "

हरवलेल्या वस्तूची किंमत अमोल आहे हें मागाहून कळलें. अनुराधेच्या मनोभूमिकेच्या उंचीच्या मानानें आपण किती पतित आहों हें त्याला कळून आलें.

" अनू, आपण एकमेकांचे हात धरले खरे पण या लांबचलांब जिन्याच्या खालच्या पायरीवर मी राहिलों आणि तूं वर चढून गेलीस. "

" विद्या, बुद्धि आणि बल यांनी श्रेष्ठ असे तुम्हीं होतां. तुमच्याबरोबर पाऊल टाकतां यावं म्हणून मी झटत राहिलें. "

प्रेमचंद शेटजींच्या बागेच्या कांपाऊंडच्या शेजारील झाडाखालीं त्यानें

तिला निरोप दिला. त्याला जाचत होतें–कालरात्री आपण इथें येऊन बसलों होतों.

" हें सगळें विसरून जा. आपल्या संसारांत या अशा गोष्टी काय क्षणिक स्वप्नासारख्या असतात–खरंच वहिनी बऱ्या आहेत ना? आणि मुलें पण–आणि बरं का? यांतलं कांहीं मनाला लावून घ्यायचं नाहीं. हें अनुराधेचें स्वप्न..."

घरीं येतांच ती त्याला म्हणाली, " नवऱ्यानें टाकलेल्या बाईबरोबर कशाला मेला इतका वेळ घालवायचा?" ऑफिसात येतांच सहकारी त्याला म्हणाले " कायहो, काल कोण तुमच्या बरोबर होतं बागेंत?" प्रेमचंद शेटजींच्या बंगल्याजवळच्या झाडाखालीं येतांच त्याचें मन त्याला म्हणालें:—

" पशो, हवन होण्याची योग्यता तुझी, देवता होऊं पाहिलेस!"

## ‘ मलयगिरिवरील वसंतकाल ’ : ७

“ कुठं जायचं ? ”

अत्तपादी खोऱ्यांतील अत्तपादी नांवाच्या एका खेडेवजा गांवाकडे जाणाऱ्या रस्त्यावर एका लहान मुलानें एक घोड्याचा छकडा उभा केला. गाडींत एक दक्षिणी पाहुणा बसला होता. त्यानें त्रासिकपणें कांहीं वेडेंवाकडें उत्तर दिलें असतें, पण त्याच्या मनांत काहीं विचार आला आणि त्यानें विचारलें,

“ अत्तपादी इथून किती दूर आहे ? ”

“ जवळच आहे. तिथं कोणाकडे जायचं ? ”

“ अच्यन कोलागिरी यांच्याकडे ”

" म्हणजे आमच्याचकडे! तुम्ही मुंबईचे पाहुणे का? अम्मामी म्हणत होती, कीं एक मुंबईचे पाहुणे यायचे आहेत."

" होय. मीच त्याना पत्र पाठविलं होतं."

" मग चला तर."

" चल ये गाडींत बैस."

त्या मुलानें गाडींत उडी टाकली आणि तो मर्यादेनें दूर बसला.

" वा: ! तुला इंग्रजी चांगलं येतं. तुझं नांव काय ?"

" माझं नांव मन्नन, आमच्या अक्कालासुद्धां इंग्रजी चांगलं येतं."

ते गांवाजवळ आले तेव्हां अंधार पडला होता, पण पूर्वेकडच्या डोंगरावर अजून ऊन पडलेलें दिसत होतें. त्यावर हिरवी झाडी, तांबडी माती आणि उन्हानें चकमणारे पाढरे दगड यानीं अपूर्व शोभा आली होती. अत्तपादी गाव त्याच नावाच्या खोऱ्यातील पश्चिमेच्या डोंगराच्या मध्यावर उतारावर वसलें होतें. एका बाजूला उभा डोंगर आणि दुसऱ्या बाजूला खोल पण रुंद दरी व पलीकडे डोंगराच्या ओळी असें स्वाभाविक रमणीय तें स्थळ होतें. आणि सूर्यास्त व्हायच्या किती तरी आधीं त्या गांवावर सांवली येई.

दुसऱ्या एखाद्या वेळीं त्या सृष्टिसौंदर्यानें त्या पाहुण्याला अतीशय मोहित केलें असतें; पण दिवसभराच्या प्रवासानें आणि त्या पूर्वीच्या अनेक दिवसांच्या श्रमानें तो अगदीं त्रासून गेला होता.

शेवटीं गाडी पांढऱ्या मातीनें सारविलेल्या लांब लांब भिंती आणि मध्यें फक्त दरवाजा असलेल्या अशा एका घरासमोर येऊन उभी राहिली. त्या मुलानें उडी टाकून दोन हांका मारतांच दार उघडलें गेलें. एका नोकरानें येऊन सामान उचलून नेलें. गाडीवाल्याचें भाडें चुकतें करतांच तो जेवायला मागूं लागला. संतापून पाहुण्यानें एक उत्तरेकडच्या भाषेंत शिवी दिली तेव्हा तो मुकाट्यानें चालता झाला.

" तुम्ही नंबुद्री का ?" पाहुणा वेताच्या खुर्चीवर टेकतांच एका म्हातारीनें बाहेर येऊन मल्याळी भाषेंत विचारलें. मुलानें त्याचें भाषांतर करून सांगितलें.

" मी महार आहें. " आधींच त्रासलेल्या पाहुण्यानें चिडून उत्तर दिलें.

" म्हणजे आम्ही शिवत नाहीं असे ? "

मलबारांत जातिभेद किती आहे याची कल्पना दोन दिवसांच्या संचारांत पाहुण्यांस आली होती. त्यानें शान्त होऊन उत्तर दिलें, " नाहीं. "

" मग नायरसारखे ? आम्ही नायरच आहोंत. "

पाहुण्यानें जास्त विचार न करिता होय म्हणून टाकलें. नंतर त्याला कुव्यावर नेण्यांत आलें. हातपाय धुवून तो तिथें गार पाणी प्याल्यानंतर त्याला कॉफी आणि कसल्याशा वडया देण्यांत आल्या.

" अच्यन कोलागिरी कुठ आहेत ? " पाहुण्यानें विचारलें.

" गावाला गेले आहेत; ते चार दिवसानीं येतील. पण आमची आक्का बाहेर गेली आहे ती आल्यावर तुमच्याशीं खूप बोलेल आणि सर्व व्यवस्था करील. आणि धाकटी मीना आहे ती तुमची करमणूक करील......... "

" अम्मामी, आक्का कुठं गेली आहे ग ?— "

" ती अमलपादीच्या परंबाला गेली आहे. "

पण पाहुण्याला त्या रात्रीं आक्का दिसली नाहीं. मीनाहि दिसली नाहीं आणि काहींच नाहीं. दीड तासानें म्हातारीनें त्याला जेवावयला सारभात वाढलें, आणि पडवींत वेळूच्या पलंगावर पथारी लावून झोंप येईपर्यंत तो विचार करीत पडला.

तो मुंबईला एका विलायती इन्शुअरन्स कंपनींत इन्स्पेक्टर होता; आणि कालिकत येथील एजंट मेल्यामुळें तेथील व्यवस्था करण्यासाठीं आला होता. बंदरावर पाय ठेवताच नारळीचे दोर, वाळलेले मासे, खोबऱ्याचीं पोतीं आणि मुसलमान लोक यांनीं त्याच्या या सुंदर प्रदेशासंबधींच्या सर्व सुदर कल्पनाची कत्तल केली. दोन दिवसात त्या बकाली बंदराचा त्याला कंटाळा आला.

वेपूर नदीच्या एका उपनदीच्या कांठीं वाळूंत सोनें सांपडे तो प्रदेश प्रेक्षणीय म्हणून त्यानें पाहिला, तेलिचेरी येथील किल्ला पाहिला, गुरवायुर आणि तलिपरम्ब येथील देवळें पाहिलीं आणि इथें काहीं पहाण्यासारखें

नाहीं असें मनाशीं ठरवून तो गेलाहि असता, पण त्याला कांहीं वर्षांपूर्वी मुंबईला येऊन गेलेल्या अत्तपादी खेड्यांत रहाणाऱ्या अच्यन कोलागिरी यांची आठवण झाली; आणि मलयगिरीमध्यें सौंदर्य पहाण्याऱ्या या शेवटच्या प्रयत्नांत त्याने सोळा मैलांचा हा टाग्याचा प्रवास केला.

खरोखरच तो किती तरी सुंदर प्रदेश! पण असुंदर संस्कृतीच्या लोकांनीं गजबजलेला. जिकडे तिकडे जातिभेद, धर्मभेद, व्यवहाराचा कुढेपणा आणि घरदार नसलेल्या नोडग्याचें प्राबल्य. दक्षिणेकडून येणारे वारे जितक्या गोडपणें रोमांचित करून जात तितक्याच कडूपणें घरवाले परक्यांना निर्वंचित करीत. निरनिराळ्या अपूर्व वनस्थलींनीं नटलेला भूप्रदेश जितका आपलेपणानें सन्मुख होई तितक्याच तुटकपणें लोक एकमेकांपासून विन्मुख होत. असा आपला त्याच्या मनाचा ग्रह झालेला.

आणि जग तरी काय त्याच्या वांटणीला असेंच. जन्मतःच पित्याच्या मृत्यूनें आई अनाथ झाल्यामुळें दूरच्या एका श्रीमंत नातेवाईकानें त्याला वाढवलेलें; तें सुद्धा मातृसुख कळत्या वयांत नाहीं. तसें जवळचें कुणी नाहींच, पण हातून घडलेल्या विचारा–अविचाराकडे सहानुभूतीनें बघणारेहि कुणी नाहीं.

पण श्रमामुळें आणि झुळझुळ वाहाणाऱ्या वाऱ्यामुळें त्याला झोंप लागलीच. सकाळीं त्याला गोड–गोड स्वप्नें पडलीं आणि त्या स्वप्नांतून तो एकदम जागा झाला.

"ते बघ, आक्का, पाहुणे जागे झाले."

त्यानें वळून पाहिलें. दरवाजातून एक अर्धवस्त्र गौरवर्णा तरुणी डोकावत होती. त्याला वाटलें, हेंहि स्वप्नच आहे. त्यानें डोळे चोळले, तोंडावरून हात फिरविला. ती तरुणी झटकन आंत गेली. तीन वर्षांची लहान मुलगी त्याच्या मंचाजवळ येऊन कलकल करूं लागली. ती मुलगी म्हणत होती.

"अहो, उठतां का? कॉफी तयार झाली."

त्या मुलीनें त्याला आपल्या बोबड्या भाषेंत कांहीं विचारलें.

"ही पहा आमची मीना. मोठी गोड आहे."

"तिला इंग्रजी शिकवा हं."

पाहुण्याचा प्रातर्विधी आटपतो तोंच मीनाच सांडत सांडत कॉफी घेऊन आली. पाहुण्याला वाटू लागलें, सकाळीं पाहिलें तें स्वप्न तर नाहीं!

"तुझ्या अक्काचं नांव काय?" त्यानें विचारलें.

"कनकांगी, तिला इंग्रजी चांगल येतं, कोचीनला जाऊन ती एक परीक्षाहि देऊन आली आहे."

स्वप्न तर नव्हेच, आणि या मलयगिरीवर येण्यासारखें आणि पहाण्यासारखें कांहीं आहे तर! गाढ झोपेंतून जागे केलेल्या माणसाप्रमाणें तो इकडे तिकडे पाहूं लागला. जिकडे तिकडे झाडझूड आणि सडारांगोळी केलेली, कुव्यावरचा गिरका आपला आवाज करीत होता. जरा गारच असा वारा वाहात होता. लहान मोठ्या झाडाच्या मधून उन्हानें प्रकाशित डोंगर दिसत होते. दारावरून कम्मार लोक हिरव्या पानाचे चुट्टे ओढीत वाद करीत जात होते. तिच्या जातीच्या स्त्रिया डोक्यावर मोठे मोठे ताडीचे घडे घेऊन गुणगुणत, बोलत आणि हंसत जात होत्या. एक शामवर्णीय नीटस तरुणी ओलेत्यानें पाणी भरीत होती. मीना शेजारीं कलकलत होतीच. तो लहान मुलगा मात्र कोठें दिसत नव्हता. त्याला मुंबईच्या चाळींतील पाण्याशीं संबंध असलेले व्यवहार लवकर आटपण्यासाठीं गडबड करणाऱ्या, रात्रीं आलेल्या घामाच्या गंधानें दरवळणाऱ्या, नळाच्या ओशट पाण्याच्या बिंदूंनीं निथळणाऱ्या, अवास्तव नागरभावामुळें इकडे तिकडे न पाहाणाऱ्या, नीटस नसल्या तरी नेटक्या, समुद्रकाठच्या हवेप्रमाणें उबटपणात आल्हादकारक, विविधजातीय, विविध वर्णीय, विविध प्रकृती ललनांची सहाजिकच आठवण झाली.

"संकोच करूं नका हं, कोलागिरी जातांना सांगून गेले आहेत मला." तीच कमनीय कनकागी स्तनावरील पदर सांवरीत येऊन म्हणाली, "ते परत येईपर्यंत तुमची सर्व सोय—"

"सर्व ठीक आहे, किती उत्तम व्यवस्था आहे इथें."

"कांहीं अगदीं जरूरीच्या कामाकरितां ते कन्नानूरला गेले आहेत."

"हरकत नाहीं, लौकर येतील ना?"

"हो चार दिवसांत येतील. तुमची फार गैरसोय होईल इथं, पण मी शक्य तो प्रयत्न करीन—"

"तुम्ही कांहीं मानूं नका, मी अगदीं सुखांत--"

मीना येऊन कनकांगीच्या ओच्याला बिलगून कांहीं सांगूं लागली.

"काय म्हणते ती?"

"ती म्हणते, तुम्ही तिला फार आवडतां."

असें हें नवल झालें. नवलच्च नाहीं तर काय? प्रमदाजनांपैकीं कुणीहि इतकें लक्ष आजपर्यंत त्याच्याकडे दिलें नव्हतें. लहानपणीं सहज लीलेनें सुद्धां कोणी मुलगी त्याच्याशीं लाडीगोडीला आल्याचें त्याला आठवत नव्हतें. कुणीहि अल्लड बालिकेनें कुतूहलानें सुद्धा आपणाकडे वळून पाहिल्याचें त्याच्या स्मरणांत नव्हतें. तसें त्याच्यांत आकर्षक कांहीं नसलें तरी जुगुप्सा करण्यासारखेंहि कांहीं नव्हतें. पण पैसा नाहीं किंवा आप्ताच्या सहानुभूतीचेंहि बल नाहीं, त्यामुळें कुणीहि स्वीकारणीय मुलगी त्याला सांगून आली नव्हती! कुणीहि पुरध्री औपचारिकपणा सोडून जरा आंतून आलेल्या स्वरानें त्याच्याशीं बोलली नव्हती.

आणि अशा उपेक्षितांपैकीं काहींत असतो तसा प्रीतिविषयक बधीरपणा जरी त्याला सुदैवानें लाभला असता तरी बरें झालें असतें. पण फुलाचा सुगंध यावा आणि फुलानें तोंड वळवावें असें झालें. संगीतानें चित्तात तरंग यावेत आणि संगीत विपर दूर जावा तसें झालें. अस्पष्ट दिसावें आणि मनाला मोह व्हावा. नुसताच लोभ पण लाभ नाहीं!

आणि यात तरी औपचारिकपणापेक्षा काय जास्त होतें? पण इतकीहि अपेक्षा नव्हती. जी पुनः दिसणार नाहीं असें त्याला वाटत होतें ती--

दुपारीं तिनें त्याला आपल्या अमलपादी येथील परंबाला नेलें. अमलपादी हें खेडें खालीं खोऱ्यांत सपाटीवर वसलें होतें.

वरच्या बाजूला भवानी नदी सात आठ मैलावर उगम पावून टेंकाडाचा बांध पडल्यामुळें डोह करून वळून जात होती. त्याच्याच एका कालव्याचें पाणी अमलपादीच्या बागायतीला येत असे.

"हे दोन मोठे वाफारे आहेत ना, यात आम्ही धान्य पिकवितों, चाम व राजी या दोन्ही जाती यात चांगल्या पिकतात– काय? तुम्हाला या माहीत नाहींत? संध्याकाळीं अम्मामी तुम्हांला त्याचं सार करून

बाढील हं ! त्याचं कोळंबो तरी किती छान होतं—" वगैरे वगैरे माहिती तो बरोबर आलेला मुलगा देत होता. त्या परंबांत केळी, नारळी, पुदीना, दालचिनी, आलें, बडीशोप, गवती चहा अशीं निरनिराळीं झाडें पाहून त्याला मोठी मजा वाटली. शाहाळीं खाणें. निरनिराळ्या कच्च्या पक्क्या फळाची चव पहाणें आणि दोघांच्याहि देशांच्या संबंधीं चर्चा करणें यांत संध्याकाळ केव्हाच झाली.

रात्रीं जेवणें झाल्यानतर मन्नन केव्हांच निजला; म्हातारी राईतील चबुतऱ्यावर मल्याळी भाषेतील गाणीं म्हणत बसली; मीनाक्षी अजून जागींच होती, ती आक्काच्या पदराशीं झोंबी खेळत काहीं काही विचारू लागली.

"काय म्हणते ती ?"

"चावट आहे कारटी !"

"तरी पण—"

"जा नीज, तुला झोंप नाहीं का आली ?"

"काहीं तरी गोड बोलत असेल; मोठी हुषार आहे पोर."

"अहो, ती मला म्हणते, पाहुण्यांचें चुंबन का घेत नाहींस !"

यानंतर कुणी कांहींच बोललीं नाहींत. मीनेला तिच्या आजीनें हांक मारली म्हणून ती पळाली. थोड्या वेळानें कनकागी आत गेली. त्याला बराच वेळपर्यंत चांगली झोंप लागली नाहीं.

सकाळीं कॉफी घेताना मन्नन त्याला म्हणाला, "आज आपणाला कुठं जायचं आहे माहित आहे का ? नदीपलीकडे आमचं सागाचं रान आहे. तिथं जायचं ठरलं आहे. तिथं जनावराचं भय असतं म्हणून मळ्यांतील दोन चेरुमनांना अक्कानं कालच यायला सागून ठेवलं आहे. आणि फराळाचं तरी किती करून घेतलं आहे तिनं ! आणि त्या रानांत ससे धरण्याची मोठी मौज आहे—"

इतक्यांत ते चरुमन आपले फरस कंबरेला खोंचून आणि त्यांच्या काठया खांद्यावर टाकून आलेच. निघण्याची तयारी झालीच होती. मीनेला चुकवून जाण्यासाठीं थोडी लपवालपवी करावी लागली, इतकेंच.

पट्टमारांत बसून ते नदीच्या पलीकडच्या तीराला गेले. ठेकेदाराच्या झोपडीजवळ येईपर्यंत चांगलाच दिवस वर आला. तिथें शेजारीं झऱ्या-

कांठीं त्यानीं जेवण केलें. उंच उंच उभे साग, ताड, वेळू यांची दाट झाडी पाहून केव्हां त्यांत शिरेन असें कोणालाहि झालें असतें. रानांत शिरतांच कांहीं ससे इकडून तिकडे धावले आणि त्यांना पकडण्याच्या निष्फळ प्रयत्नात मन्नन बराच दूर गेला. दोन्ही अतिशूद्र गडी नजरेच्या टापू बाहेर आणि हाकेच्या टापूंत चालत होते.

"तुम्ही मुंबईचे लोक किती मोकळेपणानं वागतां! मला फार आवडतं तें!"

त्याला पटल्यासारखें दिसलें नाहीं; पण "असें कां म्हणता?" असें कांहीं विचारवलें नाहीं. जाता जातां सहज तिच्या खांद्याला त्याचा स्पर्श झाला आणि त्याला थरारल्या सारखें झालें. तिनें केसाचा सुरगाठीसारखा बंध केला होता. दोन्ही नाकपुड्यात मोरण्या होत्या. नेहमीं त्याच्या पाहण्यांत होतें त्यापेक्षां जास्त भरपूर वस्त्र अंगावर होतें. हातांत सोन्याच्या निरनिराळ्या प्रकारच्या बारिक बांगड्या होत्या. पायात बुटासारख्या वहाणा होत्या.

"कस काय वाटल तुम्हाला इथं?"

"आयुष्यांत इतक्या आनंदात मी कुठंच नव्हतों."

"उगीच तोंड देखलं बोलूं नका."

"नाहीं खरंच–अगदीं मनापासून."

यानंतर त्यानें आपण कसें एकाकी आहों हें हळू हळू तिला सागितलें, आणि तिच्या भेटण्यामुळें जीवनाला कसा ओलावा आला आहे हेंहि सागितलें. आणि इथून गेल्यानंतर तिची आठवण हीच एक सुखाची बाब होणार आहे हेंहि सागून टाकलें. कायमचें तिच्याबरोबर राहण्याची इच्छाहि स्वतःच्या मनाला सागून टाकली.

आणि तिनेंहि त्याच्या या पूजनाला किती तरी प्रतिवाद दिला.

"आपण मोठीं माणस मनातलं बोलून टाकण्याच्या बाबतींत फार नाडल्यासारखीं होतों नाहीं?"

"आपण एकमेकांना फार भितों."

"यापेक्षा आमची मीना बरी, मनांत येईल तें बोलून टाकते."

"आणि कुणी प्रतिबंध केला नाहीं तर करूनहि टाकील."

" आमच्या जातींत आम्ही बायका कांहीं तरी करूं शकतों; पण तुमच्या लोकांत तर म्हणे फारच बंधनं आहेत. "

" होय, आमच्याकडे स्त्री हि अत्यंत कमनीय आणि अलभ्य गोष्ट आहे."

" तुम्ही स्त्रियाना महत्त्व देत नाहीं ? "

" अतीशय देतों. "

" आमच्या जातींत आम्ही सासरीं रहायला फारशा जात नाहीं. "

" मग ? "

" पुरुषच आमच्याकडे रहायला येतात, आणि कुणालाहि आपल्या मामाची इस्टेट मिळते. "

मोठ्या चमत्कारिक चालीरीति आहेत तुमच्या. "

" आणि आमच्याकडे पुरुष कधीं मोकळेपणें वागतच नाहींत." असें म्हणून तिनें त्याच्या खांद्यावर हात ठेवला.

" मला स्त्रियांशीं वागण्याचा प्रसंग नाहीं; त्यामुळं मर्यादेचा अतिक्रम हातून होण्याची फार भीति वाटते. "

" पुष्कळदा मर्यादा मनच्याच असतात. "

रानाच्या टोकाला कुंतलूर नांवाचें खेडें होतें. तिथें त्यानीं कुणाच्याशा घरीं कॉफी घेतली. " हा समोरचा डोंगर चढून गेलों म्हणजे आपण या बाबुलमन टोंकावर जातों. या प्रदेशातील अतीशय सुंदर ठिकाण आहे तें. आपण तिथें जाऊन येऊ. रात्रीं आपल्याला कुतलूरला मुक्काम करावा लागेल. "

गावांत कांहीं खेळगडी भेटल्यामुळें मन्ननें बरोबर येण्याचें नाकारलें. गड्याना परत पाठविणें भाग होतें; आणि तितकीशी सोबतीची जरूरहि नव्हती.

चढतांना पुष्कळदां त्याला तिचा हात धरावा लागला.

" तुमच्याकडे म्हणें एकदा संबंध घडला म्हणजे तो कधींहि मोडता येत नाहीं ! "

" कधींच नाहीं. "

" आणि कुणी वाईट निघाले तर स्त्रिया फार दुःखी होत असतील ! "

" अर्थात्. "

" आमच्याकडे आम्ही वाटेल तेव्हां संबंध तोडून मोकळीं होतों."

बाबुलमल टोंकावरून तिनें त्याला तामरसोरीची खिंड आणि पलीकडे नीलांबूर खोरें दाखविलें. या टोंकावरून समुद्र दिसतो म्हणतात; पण यावेळीं ढग जमून येऊं लागले होते; अंधार पडूं लागला होता. तो काय अभ्रामुळें कीं खरोखर तीनसाज झाल्यामुळें हेंहि कळण्यासारखें नव्हतें. खूप धुकें पडलें. एका हातावरची वाटहि दिसेनाशी झाली. पडण्याच्या भयानें त्यांना एकमेकाना बिलगणें भाग पडलें.

" आमच्याकडचा निसर्ग अगदीं लहरी आहे; पण मोठा समय सूचक आहे! त्याला सृष्टीच्या नियमापेक्षा माणसांच्याच सोईची कदर जास्त दिसते." तिनें त्याच्याकडे पाहून स्मित केलें.

त्यांना परत येण्याच्या दिशेनें हालचाल करावी लागली. काहीं उतरण झाल्यावर ती म्हणाली,

" इथं या कपारीखालीं निवाऱ्याची जागा आहे. ही येवढी सर ओसरून जाऊं द्यावी; नाहीं तर फजिती होईल."

आणि खरोखर, लगेच एक मोठी सर आलीच. निवाऱ्याच्या जागीं तिनें आपली मान त्याच्या खांद्यावर टाकली आणि म्हटले, " खरोखर, तुम्ही स्त्रियाना किती प्रेमानं वागविता ?"

पावसाच्या सरीबरोबर धुकें ओसरून गेलें, आणि सायंकाळच्या सौम्य प्रकाशात ती खोरी आणि त्यातील खेडीं विरत जाणाऱ्या स्वप्नासारखीं दिसूं लागलीं.

" मला इथून जावसंच वाटत नाहीं."

" पण आता अंधार पडत चालला आहे."

" खरोखर आपल्याला इथंच राहतां आलं असतं तर किती बरं झालं असतं!"

पण तो निघालाच. वाट निसरडी झाल्यामुळें उतरणें अवघड झालें होतें. पडलों तर एकदमच पडूं म्हणूनच कीं काय त्यानीं एकमेकांचा पूर्ण आश्रय घेतला होता. पायथ्याला येण्यापूर्वीच पुन्हा एक सर येऊन त्याना भिजवून गेली. कुतलूरच्या मुक्कामाला येतांच त्या मुलानें आणि घरमालकिणीनें त्यांना कपडे दिले; पण खूप हंसून चेष्टा केली. कनकांगी

त्याच्याकडे पाहून गालांतल्या गालांत हसूं लागली; आणि त्याला खजील झाल्यासारखें झालें.

दुसरे दिवशीं सायंकाळीं भवानी नदीच्या कांठीं फिरत असतां तो मन्ननशीं कनकांगीसंबधींच बोलत होता.

"आपण राहिलों होतों ना काल, त्याच खेड्यांतल्या कोमल कन्नन यांच्याशीं पहिल्यानं आमच्या आक्कान संबध केला होता; पण ते खूप माडी पिऊं लागले आणि रोज शिवीगाळ करूं लागले; तेव्हा त्याना सोडून अगदीं अलिकडे आक्कानं अच्यन कोलागिरी याना आणलं आहे. ते फार चागले आहेत. माझ्याशीं आणि मीनेशीं ते किती गोड वागतात. आणि त्यानीं लग्नाच्या वेळेला दिलेली आगठी आक्काला दाखव म्हणा ना. किती तरी छान आहे ती—"

"एकूण तुझी आक्का अच्यन कोलागिरीची—"

घरीं येताच पाहुण्यानें एकदम एका महत्त्वाच्या कामाची आठवण झाल्याच्या मिषानें दुसरे दिवशीं निघण्याचें ठरविलें. अच्यन कोलागिरी यांना भेटायला तो थांबला नाहीं. जाताना तो लहान मुलगा त्यांना दूर पर्यंत पोंचवायला आला. म्हातारीनें नारळ सुपारी दिली. मीना तर त्याला सोडीचना. कनकांगीनें त्याला प्रेमानें निरोप दिला. पुन्हा अगदीं लवकर येईन असें वचन घेतलें. आठवण म्हणून आपल्या वेणींतील फुलें दिलीं.

झालें हें चागलें का वाईट हेंच त्याला कळेना. आणि जें झालें त्याला कोण कारण हेंहि कळेना. मलयगिरी कीं वसतकाल, कीं स्वतःचे मन, कीं कनकागी ?

तीं फुलें त्यानें जपून ठेवलीं, आणि त्या आठवणी त्याहून जपून ठेवल्या. कुठें चुकलें कीं काय, असेंच त्याला नेहमीं वाटत राहिलें.



सात्त्विक करमणूक आणि उच्च दर्जाचें
वाङ्मय यासाठीं मासिक

# सह्याद्रि

राजकीय, वाङ्मयीन, शास्त्रीय,
ऐतिहासिक, इत्यादि अनेक
विषयांवर अधिकारी लेखकांनीं
अभ्यासयुक्त लिहिलेले लेख.

लघुकथा, लघुनिबंध, कविता,
व्यंगचित्रें अशीं करमणुकीचीं
विविध अंगें.

संचालकः न. चिं. केळकर,
५६८, नारायण पेठ, पुणें.

वार्षिक वर्गणी ३॥ रुपये.
किरकोळ अंकास ६ आणे.